# माणुसकीचा धर्म

( लघुकथा संग्रह )



लेखक

प्रा. म. ना. अदवंत

एम्. ए., बी. टी.



किंमत दीड रुपया

ति. विष्णुपंत भणगे

व

ति. सौ. सत्यभामाबाई भणगे

यांना

सादर अर्पण

—म. ना. अदवंत

# अनुक्रमणिका

## माणुसकीचा धर्म : : १

काकडे मास्तरांनी ट्रॅममध्ये पुन्हा एकदा तो तारेचा कागद खिशांतून काढला व आपल्या डोळ्यासमोर धरला.

बार्शीहून निघाल्यापासून तारेचा तो कागद वाचण्याची ही पंधरावी खेप. दर वेळेस तो कागद डोळ्यासमोर धरून त्यांतील मजकुराचा निरनिराळ्या दृष्टीने अर्थ लावण्याचा ते प्रयत्न करीत. वास्तविक तारेंत शब्द होते चारच : 'Meena ill. Start immediately.' पण त्याच चार शब्दांच्या भोंवती किती शंकाकुशंकाचें जाळें त्यांचें मन विणत होतें मीना ही त्यांची सर्वांत धाकटी व लाडकी मुलगी. मागील वर्षींच तिचें लग्न झालें होतें व आर्थर रोडवर कोणत्याशा एका मोठ्या चाळींत तिने संसाराहे थाटला होता. ती आजारी असल्याची तार आल्यापासून त्यांच्या तोंडचें पाणी पळालें होतें. मुंबईला फार मोठा दंगा चालल्याचें त्यांनी ऐकलें होतें. मुंबईत ते अद्याप कधीच गेले नव्हते, त्यांना मुंबईचें चुकण्याइतपतसुद्धा ज्ञान नव्हतें, तरसुद्धा पिशवीमध्ये एक धोतर नि एक पंचा घालून घरांतील मंडळीच्या विरोधाला न जुमानतां रात्रीच्याच गाडीने ते निघाले होते. बार्शी–लाइट रेल्वेंत चार वेळां आणि मद्रास मेलमध्ये दहावेळां असा चौदा वेळां तो तारेचा कागद त्यांनी आपल्या डोळ्यासमोर धरला होता आणि त्या चार शब्दांवर पुन्हा–पुन्हा कल्पनांचें जाळें विणलें होतें. मीना आजारी

आहे म्हणजे कितपत आजारी असेल? काय झालें असेल तिला? फार आजारी असेल का? मग ' फार आजारी ' असे शब्द तारेंत कां नाहीत? पण काळजी करण्यासारखी परिस्थिति असेल म्हणूनच ना ' ताबडतोब निघा ' असें तिच्या नवऱ्याने मुद्दाम लिहिलें? नाहीतर ' ताबडतोब निघा ' असें लिहिण्याचें काय प्रयोजन? एक ना दोन! हजारो शंकाकुशंका त्यांच्या डोक्यांत थैमान घालत होत्या.

अशा मनःस्थितींत ते दादर स्टेशनवर उतरले. मुंबईत पहिल्यानेच येणाऱ्या माणसाचा जो गोंधळ उडतो तशाच तऱ्हेचा गोंधळ काकडे मास्तरांच्या मनांत उडाला होता. अफाट अशी ती मुंबापुरींतील गर्दी व एकंदर मुंबईचें अवाढव्य स्वरूप पाहून ते खूपच गांगरून गेले होते. पण मुंबईची थोडीबहुत माहिती असणाऱ्या बार्शीतीलच एका ओळखीच्या गृहस्थाला त्यांनी आपल्या मुलीच्या बिऱ्हाडाकडे कोणत्या कोणत्या मार्गाने जावयाचें हें विचारून ठेवलें होतें आणि चुकूं नये व विस्मरण होऊं नये म्हणून ते सर्व रस्ते व ट्रॅम्-नंबर्स त्यांनी व्यवस्थित कागदावर टिपूनहि आणले होते.

आर्थर रोडवरील त्या केरमानी बिल्डिंगकडे जाण्याचे त्या ओळखीच्या गृहस्थांनी तीन-चार मार्ग सांगितले होते. पण दादरला ट्रॅममध्ये चढून लालबागला उतरावयाचें व तेथून पूल ओलांडून आर्थर रोडला त्यांनी यावयाचें हा त्यांनी सांगितलेला मार्ग अधिक बरा वाटला. चुकतमाकत, दोघातिघांना विचारीत ते दादरला ट्रॅम टर्मिनसवर आले. सहा नंबरच्या ट्रॅमवर चढले व लालबाग आलें कीं आपणाला सांगण्याबद्दल ट्रॅम-कंडक्टरला तीनतीनदा बजावून ते एका बाकावर बसले.

त्यांची ती धांदल व गडबड पाहून त्या ट्रॅम-कंडक्टरने हसून विचारलेंदेखील, "काय तात्या, आज पहिल्यांदाच मुंबईत येतायसं दिसतंय?"

" होय हो!" काकडे मास्तर कपाळावरील घाम पुशीत उत्तरले, " मुलगी आजारी म्हणून तार आली—अन् तसाच धावत आलों. पण कंडक्टरसाहेब, लालबाग आलं म्हणजे मला सांगा बरं का—विसरूं नका हं—म्हणजे असं—मला कांहीच माहिती नाही मुंबईची—लालबाग येऊन गेलं तरी पत्ता नाही लागायचा ना आम्हांला—तेव्हा सांगा हं."

त्यांच्या त्या पुन्हा-पुन्हा बजावण्याचें हसूं येऊन कंडक्टरने त्यांना लालबाग आल्यावर सांगण्याचें आश्वासन दिलें होतें आणि आता आपण लालबागपर्यंत तरी चुकत नाही या कल्पनेने निश्चित होऊन काकडे मास्तर एका बाकावर बसले होते.

आणि पुन्हा पंधराव्या वेळेला त्यांनी तो तारेचा कागद खिशांतून काढला व डोळ्यासमोर धरला.

वास्तविक त्या वेळीं मुंबई शहरांत मोठें भीषण वातावरण पसरलें होतें. जाळपोळ, गुंडांचे जमावाने हल्ले, ॲसिडफेक, सुरीने भोसकणें, इत्यादि अत्याचाराचे प्रकार जवळजवळ मुंबईतील सर्व विभागांत पसरले होते. जातीय तेढीचा वणवा इतक्या झपाट्याने पेटत होता की कोणाची कोठे कोणत्या वेळीं आहूति पडेल याचा नेम नव्हता. त्यामुळे अगोदर घराबाहेर पडण्यास बहुतेक कोणी धजावत नव्हते, व जे कोणी कामानिमित्त घराबाहेर पडत ते अगदी धडधडत्या हृदयानेच. ट्रॅममध्ये थोडींच माणसें होतीं, पण प्रत्येकाची भेदरलेली नजर सगळीकडे भिरीभिरी फिरत होती. आपल्या-शेजारीं किंवा आपल्यामागे बसलेल्या माणसाविषयीं त्यांना विश्वास वाटत नव्हता. मधूनच ठाण्-ठाण्-ठाण् करीत पोलिसांची लॉरी मोठ्या वेगाने निघून जाई. सहा-सात लोकांचा जमाव ट्रॅममध्ये शिरला की लोकांच्या भेदरलेल्या साशंक नजरा त्यांच्याकडे वळत. गुंडाचा हल्ला आलाच तर पळण्याच्या तयारीनेच प्रत्येकजण बसला होता. सगळीकडे असें भीतीचें वातावरण पसरलें होतें.

पण काकडे मास्तरांना त्याची दादहि नव्हती. वास्तविक मुंबईची त्यांना अजिबात माहिती नव्हती. दंग्याचीं भडक वर्णनें त्यांनी बार्शीला ऐकलीं होतीं नि वाचलीं पण होतीं. पण त्या साऱ्या गोष्टीपेक्षा हातांतील तारेकडेच त्यांचें अधिक लक्ष होतें. त्यांची आवडती मीना आजारी होती-ती याक्षणीं कदाचित् आपल्या आवडत्या आप्पाची आठवण करीत असेल—तिला भेटण्याची, तिचा आजार फारसा गंभीर नसल्याची खात्री करून घेण्याची उत्कट इच्छा त्यांच्या मनामध्ये होती—निरनिराळ्या शंकाकुशंकांनी त्यांचें मन व्याकुळ झालें होतें; अशा मनःस्थितींत आजूबाजूच्या भीतीप्रद

व गंभीर वातावरणाकडे त्यांचें दुर्लक्ष झालें तर त्यांत नवल नाही. ट्रॅममध्ये लोक चढत होते, उतरत होते, पोलिसांच्या लॉऱ्या टण् टण्-टण् करीत वेगाने ट्रॅमजवळून निघून जात होत्या; पण त्यांना कशाचीच दाद नव्हती. शून्य मनाने तारेचा तो कागद मांडीवर ठेवला होता व त्यांतील मजकुराभोंवती शंकाकुशंकांचें जाळें ते विणीत होते

" हां, तात्या–लालबाग आलं ! " या ट्राम-कंडक्टरच्या आवाजाने ते दचकून शुद्धीवर आले– गडबडीने तारेचा कागद खिशांत कोंबून व पिशवी उचलून ते उठले व उपरणें सावरीत लगबगीने दाराकडे जाऊं लागले तो ट्रॅम-कंडक्टर हसत थोड्या कौतुकानेंच त्यांची ती धांदल पाहत होता ट्रॅममधून खाली उतरण्यापूर्वी ते त्या ट्रॅम-कंडक्टकडे वळले नि त्यानी विचारलें, " काय हो, आर्थर रोडला कोणत्या रस्त्याने जायचे ? "

" आर्थर रोडला ? " ट्रॅम-कंडक्टर जरा त्यांच्याजवळ आला व त्याने विचारलें, " तुम्हांला कुठ जायचंय, तात्या ? "

" आर्थर रोडवर हो-माझी मुलगी तिथं राहते, काय बरं त्या बिल्डिगचं नाव ? " काकडे मास्तरांनी खिशांतून तो नकाशाचा कागद बाहेर काढला, " हां–केरमानी बिल्डिग–हा पहा नकाशा. "

ट्रॅम-कंडक्टरने तो नकाशा पाहून त्यांना म्हटलें, " हं-तात्या, या रस्त्याने सरळ जा–पूल लागेल तुम्हांला मग. त्या पुलावरून पुढे गेलं की दिसेलच ती बिल्डिग. पण जरा हुपारीने हं. हा मधला रस्ता धोक्याचा आहे-सावधगिरी बाळगा "

" हो हो–जरूर " असें म्हणत काकडे मास्तर उतरलेसुद्धा त्या ट्रॅम-कंडक्टरविषयीं क्षणभर त्यांना फार आपुलकी वाटली. मनुष्य मोठा चांगला दिसत होता उगीचच बार्शीच्या लोकांनी भडक वर्णनें करून त्यांना घाबरवलें होतें तर ! म्हणे, मुंबईचे लोक असे आहेत नि तसे आहेत आणि दंगा जोरांत आहे. असेल दंगा–पण आपण जर कोणाच्या अध्यांत नाही नि मध्यांत नाही तर आपल्याला काय भीति आहे ? उगीचच एकाद्याला मारायला मुंबईच्या लोकांना काय वेड लागलं आहे ?

अशा विचारांच्या तंद्रींतच ते निघाले. चाळीसपन्नास पावलें ते गेले असतील-नसतील तोंच एकाएकीं लोकांच्या धांवण्याचा, पळापळीचा, आरडाओरडीचा आवाज त्यांच्या कानीं आला आणि त्यांच्या तंद्रीचा एकाएकीं भंग झाला. मोठ्या आश्चर्यानें सभोंवर्ती ते पाहतात तों बरेंचसे लोक घाबरून धांवत आहेत-कोणी दुकानांत शिरत आहेत-दुकानें बंद करण्याची एकच गडबड उडाली आहे- " आले-आले-पळा-पळा " असे उद्‌गार जिकडूनतिकडून ऐकूं येत आहेत असें दृश्य त्यांना दिसलें. हें सारें दृश्य पाहून काकडे मास्तर तर अगदीं गोंधळून गेले काय करावें हें त्यांना समजेना-मुंबईच्या दंग्यासंबंधीं वाचलेलीं सर्व भडक वर्णनें त्यांच्या डोळ्यासमोर उभीं राहिलीं-पायांतला त्यांचा जोर नाहीसा झाल्यासारखा झाला-कोठे जावें, कोठें पळावें, हेंच त्यांना समजेना एखाद्या भांबावलेल्या माणसाप्रमाणे ते सगळीकडे गोंधळून पाहूं लागले. हां-हा म्हणतां सगळा रस्ता निर्मनुष्य झाला तरी काकडे मास्तरांना काय करावें नि कोठें जावें हें समजेना आणि तेवढ्यात समोरूनच पंधरावीस गुंडाचें टोळकें धावत येतांना दिसलें.

तें टोळकें पाहिल्यावर मात्र त्यांचा पुराच धीर खचला. त्यांच्याच दिशेने तें टोळकें धावत येत होतें. त्यांच्यापैकीं बहुतेकांच्या हातांत मोठमोठ्या काठ्या होत्या, पुढल्या चार-पांच गुंडांच्या हातांत तर सुरे लखलखत होते 'पकडो-मारो-काट डालो' अशा आरोळ्या टोकीत आपल्याच दिशेने येणाऱ्या त्या गुंडांना पाहून काकडे मास्तरांना ब्रह्मांड आठवलें. आता आपलीं शंभर वर्षे येथेंच भरलीं-या गुंडांच्या तावडींतून आपण आता जिवंत सुटत नाहीं अशी त्यांची खात्री होऊन त्यांच्या हातापायाला कंप सुटला. हातांतली पिशवी खालीं रस्त्यावर गळून पडली. आता कोठली मिनीची नि आपली भेट? या राक्षसांच्या हातून आपण कसले जिवंत सुटणार?-नि बार्शीला सुहास, नीला अपेक्षेने नि काळजीने माझ्या पत्राची वाट बघतील-तिनेसुद्धां किती बजावून सांगितलें की " जपून जा-गेल्यावर दोघांच्या खुशालीची तार करा. " आता कसली तार नि कसली खुशाली? नि मरणापूर्वी मिनीची भेट तरी कोठली होणार आता? या एक ना दोन विचारांनी त्यांचें सारें धैर्य गळाले- सारा रस्ता गरगरा

फिरल्यासारखा त्यांना वाटूं लागला—आपली शुद्धि हळुहळू जात आहे असा त्यांना भास होऊं लागला नि ते मटकन् खालीं बसले.

ते गुंड आरडाओरडा करीत जवळ आल्याची अस्पष्ट जाणीव त्यांना झाली—आपल्या अंगावर आता सुऱ्याचे वार बसणार या जाणिवेने त्यांनी अंगाचें मोटकुळें करून घेतलें—एकदोघांचे सुरे लकाकतांना त्यांना दिसले, "अबे, ओ काफर है—काट डालो उसको !" असे कोणीतरी उच्चारलेले शब्द अस्पष्टपणे त्यांच्या कानीं पडले; आपला हा शेवटचाच क्षण या खात्रीने काकडे मास्तरांनी रामनाम उच्चारलें नि सुरीच्या घावाला तोंड देण्याची मनाची तयारी केली.

क्षणभर कोलाहल वाढला—ते सारेच गुंड भोवती जमलेले होते—दोघा-तिघांनीं आपले सुरे उगारले होते-दुसऱ्याच क्षणीं काकडे मास्तर बळी पडणार इतक्यांत—

"ठैरो ठैरो." एकदम एक आवाज आला आाणि गळ्याभोंवती रुमाल गुंडाळलेली एक व्यक्ति एकदम पुढे आली, "खुदाकी कसम, मैं बोलता हूं—उसको मत मारो."

"अबे गफूर, तुम तो क्या पागल हो गये हो ?" दोन-तीन आवाज एकदम आले, "उसको छोडनेमे क्या मतलब ? काफर को काटना ये तो अपना एकहि सवाल है. चल हट्"

पण बोलणारी व्यक्ति एकदम पुढे आली आणि सुरे उगारलेल्या दोघातिघांना मागे ढकलत म्हणाली, "तो पहले मुझे बरबाद करो. देखो मेरी बात एक दफा सुनो. मै पीछेसे सब कुछ बोल दुंगा. मगर पहले उनको जाने दो. यहां कोइ जाननेवाले नाहि है लेकिन ये बुढा आदमी मेरे चचाके माफक मुझे है. चाहे मेरी जान चली जाय, लेकिन उनकी जान लेनेवालेका खिमा कर दूंगा."

त्या व्यक्तीचा तो अभिनिवेश पाहून इतर सर्व थंडच झाले—पण ते त्यावर गप्प बसणार होते थोडेच ? गफूरच्या जवळ एकजण गेला आणि

" अबे, तुम तो क्या दीवाना हो रहा हो ?–हटो बाजू ! " म्हणून त्याला बाजूला करूं लागला-आणि त्या दोघांची शाब्दिक झटापट सुरू झाली.

काकडे मास्तरांना या प्रकाराची कांही कल्पनाच येईना. मरणाच्या तयारीने ते सुऱ्याच्या वाराची वाट पाहत होते–पण तेवढ्यांत ' ठैरो-ठैरो ' करून कोणीतरी जवळ आल्याचा त्यांना भास झाला. एकजण कोणीतरी आपल्याला वाचवण्याचा प्रयत्न करतो आहे असें त्यांना दिसतांच जरा आश्चर्याने मान किंचित् वर करून त्यांनी पाहिलें–कोणीतरी मुसलमान होता तो. त्याची ती दाढी-गळ्याभोवती गुंडाळलेला रुमाल–उग्र चेहेरा–त्यामुळे त्यांना तो कोण असावा हें ओळखतां आलें नाही. पण तो गेंगाणा आवाज मात्र त्यांना ओळखीचा वाटत होता. पण त्यांची विचारशक्ति इतकी बोथट झाली होती आणि भीतीने त्यांच्या हृदयाचें इतकें ठाणें घेतलें होतें की त्यांच्या मस्तकांत इतर कांहीच शिरत नव्हतें. या गुंडांच्या सुऱ्यांना आपण बळी पडणार याची त्यांना खात्री वाटत होती...

—आणि इकडे त्या जमावाचा कोलाहलहि वाढत चालला होता. गफूर काकडे मास्तरांजवळून हालण्यास तयार नव्हता. इतरांनी आर्जवें केलीं–विनवण्या केल्या–धमक्या दिल्या–आता त्याला दूर लोटून त्या काफराला मारण्यासाठीं कांही जणांनी गफूरवर काठ्यापण उगारल्या–एकाच्या काठीचा घाव गफूरच्या खांद्यावर बसला. पण गफूर एक पाऊल बाजूला होईना. ' पहले मुझे काटो ' हें त्याचें ब्रीदवाक्य कायम होतें–त्याच्या साऱ्या सोबत्यांना त्याच्या या वर्तणुकीचें अत्यंत आश्चर्य वाटत होतें–तो ' दिवाणा ' झाला असल्याचें कोणी बोलत होते–आणि हळूहळू गफुरविरुद्ध तो समाज एका काफराचें रक्षण करण्याबद्दल खवळून जात होता.

या साऱ्याचें पर्यवसान कशांत झालें असतें कोण जाणे ! इतक्यांत शिट्या फुंकल्याचा आवाज कानावर आला–' घण्-घण्-घण् असे घटेचे आवाज येऊं लागले–" आया–पोलिस आया-भागो–दौडो " असें ओरडत तो समाज चारी दिशेला पांगला.

पोलिसची लॉरी आली त्या वेळीं काकडे मास्तरांचें मुटकुळें मात्र

रस्त्यावर पडलें होतें. भीतीच्या आत्यंतिक दडपणामुळे त्यांना मूर्च्छा आली होती.

* * *

काकडे मास्तरांच्या खिशांतील कागदावरील नकाशाच्या अनुरोधाने पोलिसांनी लॉरींतून काकडे मास्तरांना केरमानी बिल्डिंगकडे चालवलें होतें. पोलिसांच्या उपचाराने किंचित् सावध होऊन त्यांनी इकडेतिकडे पाहिलें. क्षणभर आपण जिवंत आहोंत याचीच त्यांना खात्री पटेना. आपण कोठे आहोंत, कोठे चाललों आहोंत, याची त्यांना कल्पना येईना.

त्यांनी डोळे उघडलेले पाहून एका पोलिसाने म्हटलें, " घाबरूं नका हं तुम्हीं—तुम्हांला तुमच्या बिऱ्हाडाकडेच नेत आहोंत. "

पण त्या शब्दाकडे त्यांचें लक्ष नव्हतें. हळूहळू मघाचा सर्व देखावा त्यांच्या डोळ्यासमोर उभा राहिला. ती त्या गुंडांची गडबड त्यांचे परजलेले सुरे—ऐनवेळीं ' ठैरो ' म्हणून पुढे आलेली ती व्यक्ति—-

—खरेंच, कोण बरें होती ती व्यक्ति ? त्या व्यक्तीचा तो गेंगाणा आवाज पूर्वी कोठेतरी ऐकला आहे खास ! सहजासहजीं विसरण्यासारखा तो आवाज नव्हता. आपल्याकरिता ' जान ' देणारा हा देवदूत पूर्वी कोठे बरें भेटला असेल आपल्याला ?

विचाराच्या व गोंधळाच्या अतिरेकाने काकडे मास्तरांनी पुन्हा डोळे मिटले. प्राणसंकटांतून वांचल्यावर जी विकलता अंगीं येते ती त्याच्या अंगीं आली होती. पण त्याबरोबरच पुन्हा त्यांचे विचार त्यांच्या मुलीकडे वळले. मिनी आजारी आहे—आपण तिला भेटायला चाललों होतों—मग हे लोक नेताहेत तरी कोठे आपल्याला ? क्षणभर ओरडून कांही-तरी सांगावेंसें त्यांना वाटलें—त्यांनी तसा प्रयत्न केला—पण तोंडांतून शब्द बाहेर येईना—घशाला अगदीं शोष पडला होता—

—आणि तेवढ्यांत मोटार थांबली. काकडे मास्तरांनी उठून बसायचा प्रयत्न केला—पण तो त्यांना साधला नाही. दोन पोलिसाच्या सहाय्याने ते उठून बसले, एक त्या नकाशाच्या कागदाकडे बघून दुसऱ्या दोघांना

कांहीतरी सांगत होता—एकूण आपण आपली मिनी राहते त्या इमारती-पाशी आलों तर! पण त्या पोरीचें आतां कसें असेल?

पण त्यांच्या शंकाकुशंकांना अवसरच मिळाला नाहीं– त्यांच्या समो-रच त्यांची मिनी येऊन उभी राहिली होती—क्षणभर डोळयांची उघडझाप करून त्यांनी तिच्याकडे पाहिलें. हो, त्यांचीच मिनी होती ती! कांहीतरी बोलत होती ती. काय बोलत होती हें त्यांच्या मस्तकांत शिरत नव्हतें—पण ती सुरक्षित होती, त्यांच्यासमोर उभी होती, याचाच त्यांना केवढा आनंद झाला! 'मिनी-मिनी' म्हणून हाक मारण्याचा प्रयत्न करून ते पुन्हा उठूं लागले, पण या खेपेस त्यांच्या मिनीने त्यांना सावरलें

मिनीचा आजार मुळी फारसा गंभीर नव्हताच साधा ताप होता तिला. पण आदल्या रात्रीं टेंपरेचर एकाएकीं चढल्याने मिनीच्या नवऱ्याने घाबरून तार केली होती. आता तिचा ताप निघाला होता. पण—सारखी हीच काळजी तिला वाटत होती—मुंबईत दंगा सुरू, आप्पाना तर मुंबईची काडीमात्र माहिती नाही, आले मुंबईत नि सापडले दंग्यांत कोठे तर? तीच काळजी तिच्या मनाला सारखी जाळत होती —आणि आप्पांची हकीगत ऐकून एकीकडे आपली भीति किती सबळ होती असें तिला वाटत होते तर एकीकडे त्या रहस्यपूर्ण व्यक्तीसंबंधीं विलक्षण विस्मयहि वाटत होता.

खुद्द काकडे मास्तरांना तें गूढ चांगलेंच जाचत होते! त्या व्यक्तीचा तो गेंगाणा आवाज आपण कोठेतरी ऐकला खास. कोठे बरें ऐकला असेल तो? गफ़ूर हें नाव धारण केलेल्या व्यक्तीशीं कोठें बरें आपला संबंध आला असेल? या निरनिराळया प्रश्नांनी त्यांना अगदीं भंडावून सोडलें होतें. त्यांनी आपल्या स्मृतीचीं सारीं दालनें उघडून पाहिलीं—

—आणि एकदम त्यांना त्या साऱ्या घटना आठवल्या. वीस वर्षां-पूर्वीची गोष्ट होती ती! महिनाअखेरचा दिवस होता तो. साधारणपणें महिनाअखेर म्हणजे शिक्षकाचा घातवारच. विद्यार्थ्यांच्या मार्कांची बेरीज, नंबर लावणें, फीचा हिशेब करणें, जुना कॅटलॉग पुरा करणें, नवा तयार करणें—एक ना दोन! आणि त्यांत पुन्हां फीचा हिशेब जमेनासा झाला म्हणजे विचारायलाच नको! काकडे मास्तरांवर तीच आपत्ति

आली होती—अर्धा तास उलस्यासुलस्या बेरजा करूनहि दीड आण्याची चूक त्यांना कोठे सांपडत नव्हती. म्हणून त्यांचें मस्तक अगदीं भ्रमून गेलें होतें. त्यांतून पुन्हा फी न दिल्यामुळें ज्या एका विद्यार्थ्याचें नांव काढूं नये म्हणून त्यांनी गेले तीन महिने हेडमास्तरांजवळ रदबदली केली होती त्या विद्यार्थ्याने याहि महिन्यांत फी दिली नव्हती, इतकेंच नव्हे तर गेल्या पंधरा दिवसांत त्याने तोंडहि दाखविलें नव्हतें! हेडमास्तरांच्या मनांतून त्याला शाळेंतून केव्हाच काढावयाचें होतें. पण काकडे मास्तरांच्या शब्दासाठी अनिच्छेने त्यांनी त्याचें नांव ठेविलें होतें. पण या महिन्याला त्यांना चांगलेंच कारण मिळालें-व कोणाकरितां रदबदली करावी याचें तारतम्य नसल्याबद्दल त्यांनी काकडे मास्तरांना चांगलाच दोषहि दिला होता.

या वादामुळे नि चुकत असलेल्या हिशोबामुळे काकडे मास्तरांच्या कपाळावरील आंठी अधिक स्पष्ट दिसत होती. त्यांचे इतर व्यवसायबंधू आपलें काम संपवून केव्हाच गेले होते. शिक्षकांच्या खोलींत पूर्ण शुकशुकाट होता, आपणहि आता एकदाच प्रयत्न करून हिशोब जमतो का पाहावा, नाहीतर कॅटलॉग घरीं न्यावा या विचाराने काकडे मास्तरांनी पुन्हा कॅटलॉगवर नजर टाकली व जमा झालेल्या फीचा हिशोब ते करूं लागले.

तेवढ्यांत त्यांच्या कॅटलॉगवर कोणाची तरी सांवली पडली. मधेच कोणाचा व्यत्यय आला म्हणून चिडून त्यांनी वर मान केली तों समोर गफूर उभा. त्याला पाहतांच त्यांच्या कपाळावर आठ्यांची अधिकच गर्दी झाली.

"आलांत का आपण?" काकडे मास्तर उपरोधिक स्वराने म्हणाले, "बरीच लवकर आठवण झाली शाळेची! पुन्हा मीं हेडमास्तरकडे नांव काढूं नये म्हणून रदबदली करावी म्हणून सांगायला आलास ना? नि पंधरा दिवस कोठे दडली होती स्वारी? का वडिलांप्रमाणे हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत भाग घ्यायला गेली होती? तें कांही नाही—" पण गफुरच्या हुंदक्याने एकदम दचकून भाषण अर्धवटच सोडून त्यांनी त्याच्याकडे पाहिलें. त्याचे तारवटलेले नि खोल गेलेले डोळे पाहून आणि त्याचें ओक्साबोक्सी रडणें ऐकून त्यांचें भाषण अर्धेच विरलें. खुर्चीवरून उठून ते

गफूरजवळ आले आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यांनी विचारलें, " कां रे--काय झालंय्? रडतोस कां असा?--फी देतां येत नाही म्हणून?"

" सर, सर, मेरी मा बहोत बीमार है..." कसें तरी अडखळत गफुरने शब्द उच्चारले. त्याला पुढें बोलवेना.

काकडे मास्तर एकदम दचकले. उनाडकी हेंच केवळ गफुरच्या गैर-हजेरीचें कारण असलें पाहिजे अशी त्यांनी आपली समजूत करून घेतली होती-पण तशी समजूत करून घेतांना आपण किती अन्याय करीत होतों हें त्यांच्या लक्षांत आलें. कांही कारणामुळे गफूर गैरहजर असेल अशी कल्पना तरी कशी आपल्या डोक्यांत आली नाहीं याचें त्यांना नवल वाटलें.

" कशाने आजारी आहे तुझी आई ? " काकडे मास्तरांनी त्याला विचारलें.

" सर, आज पंधरा दिवस सारखा ताप आहे तिला--डॉक्टर म्हणतात, टाइफाइड् आहे--ते म्हणतात, औषध पाहिजे, फळं पाहिजेत... अन्-अन्...काळजी घेतली पाहिजे," अडखळत हुंदके देत गफूर बोलत होता, " पण सर, अली तुरुंगांत गेल्यापासून कोणी बघत नाही आमच्या-कडे--उसने पैसे कोणी देत नाही--सर, आज दोन दिवस मा फार--फार बीमार आहे हो..." गफूरने आपल्या हातांत तोंड खुपसलें व पुन्हा हुंदके द्यायला सुरुवात केली.

साऱ्या परिस्थितीची कल्पना येऊन काकडे मास्तरांचें हृदय एकदम कळवळलें. पांच महिन्यांपूर्वी सोलापूरला झालेल्या हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत गफुरच्या बापाला पकडलें होतें व कांही गंभीर आरोप त्यांच्यावर शाबीत झाले होते. ती वार्ता बार्शीला आल्याबरोबर सारी हिंदु जनता या बारा वर्षांच्या पोरावर नि त्याच्या आईवर उलटली होती. त्या दोघांवर बार्शी-तील हिंदु जनतेने उघड-उघड बहिष्कार पुकारला होता. गफुरचे एक एक हिंदु मित्र त्याला महारोग्याप्रमाणे टाळूं लागले होते, इतकेंच नव्हे तर त्याच्या वर्गातील विद्यार्थ्यांनी हरप्रसंगी त्याचा अपमान करण्यास सुरुवात केली होती. शाळेंतील शिक्षक त्याच्या वडिलांचा अप्रत्यक्षपणें तिरस्कार-

पूर्वक उल्लेख करूं लागले होते. आणि रस्त्याने जातांना लोकांचे जहरी वाग्बाण त्याला ऐकावे लागत असत. त्याच्या आईची हमीदाबिबींची—तर फारच व्याकूळ अवस्था झाली होती. तिचें घर होतें हिंदु वस्तींत. तिची सारी ओळख मराठा व कोष्टी बायांशीं. पण त्या तर उघड-उघड तिचा पाणउतारा करूं लागल्या. तिला घराबाहेर पडणें अशक्य होऊन बसलें!

अशा या वादळांत आई आजारी पडल्यावर बारा वर्षांचें हें पोर किती बावरून गेलें असेल याची कल्पना काकडे मास्तरांना आली. हमीदाबिबी आजारी पडल्याबरोबर माणुसकीची साधी जाणीव विसरून "बरं झालं! चागलं पापाचं फळ मिळालं!" असें म्हणणाऱ्या व त्याबद्दल आनंद मानणाऱ्या बार्शीकरांच्या संकुचित वृत्तीची त्यांना जाणीव होती. आणि टॉयफॉईड म्हणजे साधा आजार नव्हे.

"मूर्खा, मग इतके दिवस कां सांगितलं नाहीस? मीं नसती का मदत केली?" काकडे मास्तर म्हणाले.

"सर, पण तुम्ही रागावला होता आमच्यावर-सारेच्चजण रागावले आहेत आमच्यावर अब्बांनी दंग्यांत भाग घेतला म्हणून—मला भीति वाटली, सर—" गफूर केविलवाण्या स्वरांत बोलत होता.

"गाढव आहेस अगदी!" काकडे मास्तर मधेच म्हणाले, "अरे, तुझ्या वडिलांनी दंग्यांत भाग घेतला याचें प्रायश्चित्त तुम्हांला कां म्हणून? कांही माणुसकी वगैरे आहे की नाही आम्हांला? एका माणसाने बीमार असलेल्या दुसऱ्या माणसाला मदत करायची नाही तर मग जगायचें कशाकरिता? अरे, मी हिंदु नि तूं मुसल्मान असलास तरी आपण दोघं माणसंच ना? चल, आटप--मी घरीं येतों तुझ्या!"

"सर, तुम्हीं घरीं येणार माझ्या?" आश्चर्याने नि आदराने गफूरने विचारलें सार्‍या हिंदूंनी आपल्या घरावर बहिष्कार घातला असतां काकडे मास्तर आपल्या घरीं येणार ही घटनाच त्याला अद्‌भुत वाटत होती.

यावर काकडे मास्तर फक्त हसले. कॅटलॉग वगैरे गुंडाळून गफूरच्या मागोमाग ते निघाले

आणि गफुरच्या घरचें तें करुण दृश्य पाहून त्यांच्या हृदयाला धक्काच बसला. हमिदाबिबीचा ताप तर चारपर्यंत गेला होता—तिची शुद्धि हरपली होती—शेजारींच एक पलिकडल्या गल्लींतील म्हातारी बाई बसली होती—औषधाच्या एक-दोन रिकाम्या बाटल्या व दोन तीन मोसंबी एवढेंच काय तें रोग्याच्या बिछान्याशेजारीं दिसत होतें.

"मा मा" गफूर हामिदाबिबीजवळ बसून तिला हालवून म्हणाला. पण तिचें उत्तर न आल्याने घाबरुन त्याने रडायला सुरुवात केली.

हें सारें दृश्य पाहून काकडे मास्तरांचें हृदय द्रवलें. त्यांनी गफूरला उठवून धीर दिला आणि सारीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं.

बँकेंतून साठ रुपये काढून त्यांनीं डॉक्टरांना आणलें, डॉक्टरांनी सांगितलेलीं इंजेक्शनें आणि औषधें आणवलीं, हमिदाबिबीच्या शुश्रूषेची सोय केली, फळफळावळ पुरवली आणि गफुरला वेळोवेळीं धीर दिला. थोडक्यांत म्हणजे गफुरबरोबर त्यांनी हमिदाबिबींचा आजार बरा होण्या-साठीं जिवाचें रान केलें.

पण हें करतांना किती विरोध सहन करावा लागला त्यांना! अली-वर चिडलेल्या संकुचित वृत्तीच्या हिंदुत्वनिष्ठांना हमीदाबिबीचा आजार ही स्वागतार्ह घटनाच वाटत होती. त्यामुळे तिला बरें वाटावें म्हणून धडपड-णाऱ्या काकडे मास्तरांवर तो समाज जळफळूं लागला. हिंदुधर्माच्या शत्रू-साठी त्यांनी ही धडपड करावी हें त्यांना आवडलें नाहीं. एकादोघांनी उघड-उघड त्यांना तसें न करण्याचा सल्ला दिला पण 'मी हिंदु व मुसल-मान यापैकी कोणताच धर्म ओळखत नाहीं. मी एकच धर्म ओळखतों तो म्हणजे माणुसकी.' हें त्यांना उत्तर मिळाल्यापासून त्यांनी त्यांना 'हिंदु-धर्माचे शत्रू' म्हणून संबोधण्यास सुरुवात केली होती. त्यांच्या वर्तनाचा जिकडेतिकडे निषेध होऊं लागला—शिक्षकबंधूंनी त्यांच्या पाठीमागे त्याच्यावर निंदेची झोड उठविली—आणि त्यांनी चिथावल्यामुळे विद्यार्थीवर्गातहि त्यांना पदोपदीं अपमान सहन करावा लागला. विद्यार्थ्यांच्या जगांत लोक-प्रियतेच्या शिखरावरून ते एकदम खालीं आले. त्याच्याविषयीं विविध प्रकारचें वाङ्मय फळ्यावर लिहिलें जाऊं लागलें.

पण या साऱ्या विरोधाला काकडे मास्तरांनी शांतपणें तोंड दिलें. आणखी एक व्यक्ति त्यांच्या पाठीशीं होती. ती म्हणजे त्यांची पत्नी. माणुसकीचा धर्म काकडे मास्तरांनी तिला पटवून दिल्याबरोबर तिने आपलें कर्तव्य ओळखलें–हमिदाबिबीची शूश्रूषा करण्यासाठी टवाळ बायकांच्या वाग्बाणांना तोंड देत सकाळसंध्याकाळ ती हमिदाबिबीच्या घरीं जाऊं लागली.

या दोघांचे कष्ट गफूर मोठ्या विस्मयाने अन् आदराने पाहत होता– त्याला आतापर्यंत हिंदूंचा अनुभव निराळाच आला होता–आणि दंग्याच्या प्रसंगापासून तर प्रत्येकाने त्याला दूर लोटलें होतें. पण हीं दोघेजण माकरितां जीवाचें रान करीत होतीं. या दोघांच्या प्रयत्नाने हमिदबिबीचा ताप एकविसाव्या दिवशीं उतरला नि डॉक्टरांनी "आतां काळजीचें कांही कारण नाही." असें सांगितलें त्या वेळी तर कृतज्ञतेच्या अश्रूंनी त्याचे डोळे भरून आले होते. त्या भरांत त्याने मास्तरांच्या पायावर लोटांगण घातलें नि भारावलेल्या स्वरांत तो म्हणाला, "मास्तरसाहेब, आमच्या कातड्याचे जोडे करून तुमच्या पायांत घातले तरी तुमचे उपकार फिटायचे नाहीत. तुम्ही दोघांनी माझी मा परत दिली. खुदाची कसम घेऊन सांगतों, वेळ आली तर तुमच्याकरिता जान देईन मी!"

काकडे मास्तरांनी त्याला वर उचललें व त्याचे अश्रु पुसून म्हटलें, "बाळ, आम्ही माणुसकीला जागलों. दुसरें कांही केलें नाही. एका माणसाने दुसऱ्या माणसाला केलेल्या मदतबिद्दल उपकाराची भाषा कशाला?"

यानंतर थोड्याच दिवसांनी अली सुटून परत आला. पण बार्शीला राहणें अशक्य झाल्यामुळे त्या सर्वांनीच बार्शी सोडली. जातांना गफूर काकडे मास्तरांकडे निरोप घ्यायला आला असतांना एकाच वाक्यांत त्यांनी गफूरला निरोप दिला होता. 'माणुसकीच्या धर्माला जाग.' हेंच तें वाक्य.

वीस वर्षांपूर्वींचा तो प्रसंग–आणि त्यानंतर आज गफूरची झालेली विलक्षण भेट!

त्यावेळच्या त्या गफुरमध्ये आणि आजच्या गफूरमध्ये केवढी तफावत: त्या वेळचा तो निष्पाप, हसरा व हळव्या मनोवृत्तीचा गफूर कोणीकडे

आणि आजचा धिप्पाड, क्रूर नजरेचा आणि खुनशी वृत्तीचा गफूर कोणीकडे! वीस वर्षांत काळाने केवळ त्याच्या बाह्य स्वरूपांतच नव्हे तर अन्तरंगांतहि क्रांति केली होती. त्याच्या त्या गेंगाण्या आवाजापलिकडे पूर्वीच्या गफूरचा एक अंशहि त्यांना आजच्या गफूरमध्ये दिसत नव्हता.

आणि असें असूनहि आजच्या गफूरने आपलें वीस वर्षांपूर्वीचें वचन पाळलें होतें. "खुदाची कसम घेऊन सांगतों, वेळ आली तर तुमच्या-करिता जान देईन मी!" हे आपले शब्द किती खरे करून दाखविले होते त्याने!

आपल्या स्वतःचा प्राण धोक्यांत घालून त्याने आपला प्राण वाचवला होता, आपण दाखविलेल्या माणुसकीची परतफेड माणुसकी दाखवून त्याने केली होती जातीय राजकारणांत एरवी दगडासारखें झालेलें त्याचें मन माणुसकीचा धर्म विसरलें नव्हतें. काफर म्हणून कित्येक निरपराधी हिंदूंना यमसदनी पाठविणाऱ्या त्याच्या हृदयांत माणुसकीची ज्योत अद्याप तेवत होती.

गफूर त्यांना पुढे कधीच दिसला नाही. पण 'मै अपनी जान दूंगा फिर इनकी जान लेनेवाले का खिमा कर दूंगा!" असें म्हणत आपणाला बचावण्यासाठी सुऱ्याचे घाव सहन करण्याच्या तयारीने उभे असलेल्या गफुरचें चित्र मात्र त्यांच्या हृदयांत कोरलें गेलें होतें.

पाशवी व अत्याचारी वृत्तीवर माणुसकीच्या धर्माने, क्षणिक का होईना, पण मिळविलेला विजयच त्यांना जणू कांही त्या चित्रांत दिसत होता.



## वादळ : : २

आबा देशपांडे व आप्पा कुलकर्णी यांचे बंगले रत्नागिरीच्या पार एका टोकाला–सड्यावर–शेजारीं शेजारीं होते त्या बंगल्याच्या आसपास तशी फार वस्ती पण नव्हती. एकमेकांचा शेजार सोडला तर दुसरा शेजार शोधायला त्यांना फर्लांगभर वरती किंवा फर्लांगभर खालतीं तरी जावें लागेल असे अगदीं एका बाजूला बंगले होते त्यांचे.

तरी पण त्या दोघा शेजाऱ्यांमधून अग्नीच काय–पण जिवंत फुरसं देखील जात नव्हतं.

वास्तविक ते दोघेहि पूर्वी फार मोठे स्नेही होते–दोघांनाहि क्रिकेटचें वेड होतें. दोघेहि रेव्हिन्यु डिपार्टमेंटमध्ये एकाच खात्यांत काम करीत होते. आणि दोघांच्याहि कुटुंबामध्ये घरोबा चांगला होता. बंगल्याकरितां गांवापासून इतक्या लांब जागा निवडतांना दोन्ही कुटुंबांना एकमेकांची सोबत होईल अशी त्यांची कल्पना होतीच, पण जवळ जवळ बंगले बांधल्याने आपल्या मैत्रीला दृढ स्वरूप येईल अशीही त्यांची खात्री होती.

आणि बंगले बांधून झाल्यावर कांही काळ त्यांची ती खात्री खरी सुद्धा ठरली. आबा आणि अप्पा यांच्या कुटुंबांमधील संघटण वाढूं लागलें. आबाचीं दोन मुलें सदोदित आप्पाच्या घरीं खेळूं लागलीं. आप्पाच्या घरीं केलेल्या भाजीची चव प्रथम आबांना मिळूं लागली व आबाच्या घरीं

केलेल्या नवलविशेषाची खबर प्रथम आप्पांना लागूं लागली. अप्पा आणि आबा या दोघांच्या क्रिकेटविषयक गप्पा रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत रंगूं लागल्या. दीड वर्षांपर्यंत त्या दोन बंगल्यांतील वातावरण अगदीं खेळी-मेळीचें होतें. इतक्यांत क्रिकेटच्या सामन्यांचा मोसम आला आणि वातावरण गढूळ होण्यास सुरवात झाली.

क्रिकेटचे सामने हे रत्नागिरीचें वैशिष्ट्य होतें. कुणीतरी एका क्रिकेटप्रेमी गृहस्थाने एक फिरती ढाल ठेवली होती व त्यासाठी दरवर्षी निरनिराळ्या संघामध्ये सामने होत—आणि त्यांमध्ये चुरसहि निर्माण होई. आपल्या संघाला ढाल मिळावी म्हणून कित्येक संघ परगांवाहून विख्यात खेळाडूंना आपल्या संघातर्फे खेळायला बोलावीत. कित्येक वेळां गंमत अशी होई की एकाद्या संघांत फक्त संघनायकच रत्नागिरीचा असे आणि बाकीचीं दहा ‘ पार्सलें ’ बाहेरगांवाहून मागवलेलीं असत. फक्त एकच संघ अशीं ‘ पार्सलें ’ मागविण्याच्या विरुद्ध होता; तो म्हणजे ‘ नवयुवक ’ संघ. त्यामुळे रत्नागिरींतील क्रिकेटप्रेमी लोकांचें याच संघावर विशेष प्रेम असे. आणि याच संघातर्फे आबा आणि आप्पा आज चार वर्षे खेळत आले होते. या संघावर त्यांचें विलक्षणच प्रेम होतें आणि त्याला यश मिळावें म्हणून इतरांबरोबर यांच्या जीवाची आटापीट चाले.

त्यामुळे ‘ रत्नागिरी टीम ’ या आठ बाहेरचीं ‘ पार्सलें ’ आणलेल्या संघाशीं चाललेल्या उपान्त्य सामन्यांत आबाच्या गोलंदाजीवर उडालेला एका उत्कृष्ट फलंदाजाचा सोपा झेल ज्यावेळीं आप्पाने सोडला त्यावेळीं आबा अतिशय संतापला. “ मूर्खा, ” तो ओरडला, “ एवढा सोपा झेल झेलतां येत नाही ! क्रिकेट खेळतोस कीं थट्टा करतोस ! ”

आप्पाला हे शब्द चांगलेच लागले. झेल अगदीं सोपा होता आणि तो त्याच्या हातून सुटला होता हें खरें. पण त्याबद्दल खेळ चालू असतांना आबानं आपणाला मूर्ख म्हणायचें कांहीच कारण नव्हतं. आणि त्याच फलंदाजाने पुढे एकशेंवीस धावा काढून सामना जिंकला म्हणून काय झालें ? त्यासाठी आबानं प्रत्येकाजवळ “ आप्पानं झेल सोडला नसता तर

खात्रीने विजय आपणालाच मिळाला असता." असें म्हणावें म्हणजे काय?

—आणि त्या रात्रीं आबा गप्पा मारण्यासाठी आप्पाच्या बंगल्यांत गेला असतांना सुद्धा डोकें दुखण्याच्या सबबीवर आप्पाने त्याची भेट घेण्याचें नाकारलें.

ही नुसती सुरुवात झाली. त्यानंतर कितीतरी प्रसंग एकामागून एक होत गेले—आणि त्यांनी या परस्परांमधील मतभेद अधिकच तीव्र केला. कांही प्रसंग सहजगत्या घडले—कांही दैवाने घडवून आणले.

रेव्हेन्यू खात्यांतील हेडक्लार्कच्या परिक्षेला दोघेहि बसले होते–त्यांत आप्पा परिक्षेंत पास झाला आणि आबा नापास झाला. आप्पाची वरिष्ठ अधिकारी म्हणून नेमणूक झाली. आणि त्या अधिकारांत आबांच्या कामांतील दोष दाखविण्याचा त्याच्यावर वारंवार प्रसंग येऊं लागला.

त्याबरोबरच आबांचीं मुलं आप्पाच्या घरीं जाण्याचें बंद झालें. आप्पांना त्या मुलांचा अतिशयच लळा लागला होता, 'आप्पाकडे जायचं' म्हणून मुलें रडत, ओरडत. पण त्या हट्टाबद्दल त्यांना आबाकडून धपाटे मिळत. शेजारच्या बंगल्यांतून आप्पाला साश्रुयुक्त नयनांनी ते ऐकावे लागत.

दोन बंगल्यामधील गडग्यांतील दगड काढून केलेली वाट केव्हाच बुजवून टाकण्यांत आली होती. घरच्या माणसांना इकडच्या बंगल्यांतून तिकडच्या बंगल्यांत जाण्याची बंदी करण्यांत आली होती–इतकेंच नव्हे तर इकडच्या बंगल्यांतील म्हैस चुकून तिकडील बंगल्याच्या आवारांत गेली तर खरपूस मार खाल्ल्याशिवाय परत येत नसे. एका बंगल्यांतील मोलकरणीला देखील दुसऱ्या बंगल्यांतील मोलकरणीशीं बोलायची बंदी होती. एकदां आबाच्या बंगल्यांतून मोलकरणीने आप्पाच्या बंगल्यांतील मोलकरणीला कांही तरी विचारलें. ताबडतोब आबाने तिला बोलावून चांगली समज दिली आणि पुन्हा असा अपराध करतांना आढळल्यास कामावरून काढून टाकण्याची धमकी दिली.

मतभेदाचे वारे याहिपेक्षा पुढे गेले होते. एके दिवशीं आप्पांनी आपल्या दूधवाल्याला सांगितलें, " हें पहा–तुम्ही पलीकडच्या बंगल्यांत दूध

घालणार असाल तर आजपासून माझ्याकडे दूध घालणें बंद करा. दोघांपैकीं कुणातरी एकाचा रतीब तुम्हांला ठेवतां येईल." आणि एकदां आबांची बायको कांही मोळीवाल्याकडून मोळ्या घेत असतांना त्यापैकी एका मोळीवालीनें म्हटलें, "बाई, तुमच्या पल्याडल्या बंगल्यांत चौदा चौदा आनं दिलं भारीला." आणि हें आबानें ऐकलें मात्र–ताबडतोब ते बाहेर आले आणि साऱ्या मोळीवाल्यांना मोळ्या उचलून चालायला लावलें.

आबा आणि आप्पा यांच्यामधील या भांडणाची हकीकत हां हां म्हणतां साऱ्या गांवांत पसरली. लोकांना तरी काय–असेंच कांही तरी पाहिजे असतें. भांडण मिटविणाऱ्यापेक्षा भांडणाच्या आगींत तेल ओतणारी विघ्नसंतोषीं माणसेंच समाजांत जास्त असतात. त्यांनी हळूहळूं एकमेकां-विरुद्ध खोट्यानाट्या कागाळ्या सांगून एकमेकांचीं मनें एकमेकांविषयीं गढूळ करण्याचा प्रामाणिक प्रयत्न सुरू केला–आणि त्यांच्या प्रयत्नाला यशहि चांगलेंच येऊं लागलें. आप्पांच्या हाताखालीं काम करतांना आबांना इतका कांहीं त्रास होऊं लागला कीं त्यापेक्षां नोकरी सोडलेली परवडली असें त्यांना हळूंहळूं वाटूं लागलें. आणि त्याचा सूड घेण्यासाठीच की काय ते आपल्या अजाण लहान मुलांना अप्रत्यक्ष आप्पावर शिंतोडे उडविणारीं वाक्यें शिकवून आप्पाच्या बंगल्याजवळील गडग्याच्या भिंतीशीं उभे राहून त्यांना तीं मोठमोठ्यानें ओरडायला सांगूं लागले. त्या अजाण मुलांना त्यांच्या हेतूची काय कल्पना ! ते तीं शिकविलेलीं वाक्यें जोरजोरांत ओरडून म्हणत–आणि आनंदाने टाळ्या पिटत. आप्पांना मात्र तें ऐकून लहान मुलांना आपल्याविरुद्ध चिथविल्याबद्दल आबाची अधिकच चीड येई.

आबाच्या आणि आप्पाच्या बायकांची या भांडणामुळें चमत्कारिकच स्थिति झाली होती. त्या दोघींचं एकमेकांशीं भांडण तर बिलकूल नव्हतें, उलट आबा आाणि आप्पा यांनीं उकरून काढलेलें भांडण त्या दोघींना पूर्ण नापसंत होतें. पण तसें उघड बोलण्याची त्यांना चोरी होती. अनिच्छेनेच त्यांना आपल्या पतींबरोबर या भांडणांत पडावें लागलें. आप्पा किंवा आबा असतांना एकमेकींशीं बोलणें त्यांना शक्यच नव्हतें पण ते नसतांनासुद्धा एकमेकींकडे जाऊन गप्पा मारीत बसण्याची त्यांना भीति वाटत असे. न

जाणो, चुकून ही बातमी त्यांच्या कानावर गेलीच तर चांगलीच कंबक्ती निघायची. एकदां 'काकू' आपल्या घरीं आल्याची बातमी चुकून आबाच्या अजाण मुलाने आबाला दिली—अन् मग ते असे खवळले म्हणता! पलीकडच्या बंगल्यांत ऐकूं जाईल इतक्या मोठ्याने त्यांनी आपल्या पत्नीवर तोंडसुख घ्यावयाला सुरवात केली—आणि तें ऐकून आप्पानांही ही बातमी कळली अन् त्यांनीही आपल्या पत्नीची चांगलीच हजेरी घेतली तेव्हापासून त्या दोघींनी एकविचारें ठरविलें की जें कांही बोलायचें वगैरे असेल तें अगदीं गुप्तपणें, दोन्हीं मुलें झोंपल्यावर.

अर्थात् आबा आणि आप्पांच्या या भांडणाचा फायदा घेण्याचा क्रिकेटच्या इतर संघांतील लोकांनी खूपच प्रयत्न केला. आप्पा उत्कृष्ट फलंदाज होते तर आबा नाणावलेले गोलंदाज होते. त्यांपैकी कुणी जरी 'नवयुवक' संघांतून गेला असता तर संघाचें सामर्थ्य खूपच कमी झालें असतें. पण इतर ठिकाणीं अत्यंत तीव्र मतभेद निर्माण झालेल्या आबांचें आणि आप्पांचें 'नवयुवक' संघावरील निष्ठेच्या बाबत पूर्ण मतैक्य होतें. दोघेही 'नवयुवक' संघ सोडण्यास तयार नव्हते. प्रतिपक्षाच्या लोकांनी निरनिराळे डावपेंच लढविले—निरनिराळ्या कंड्या उठविल्या—दोघांच्या मनांत एकमेकांविषयीं विष पेरायचा प्रयत्न केला—पण त्यांचे ते सारे प्रयत्न फुकट गेले. त्या दोघांपैकीं कुणीच 'नवयुवक' संघ सोडायला तयार नव्हता, इतकेंच नव्हे तर गंमत म्हणजे दोघांपैकी कुणीही 'नवयुवक' संघ सोडणार नाही अशी एकमेकांविषयीं त्यांना खात्री होती. 'आबा नवयुवक संघ सोडून रत्नागिरी संघातर्फे खेळणार आहे' असं कुणीही आप्पाला सांगितलें तरी ते निषेधार्थी मान हालवित आणि म्हणत, "छे छे! आबा एरवीं कितीहि वाईट असला तरी तो आपल्या संघाशीं कधींच बेइमान होणार नाही."

पण त्यावर्षी मात्र त्यांच्या प्रतिपक्षांनी आपल्या कारवायांनी चांगलाच डाव टाकला होता. नवयुवक संघांतील कांही खेळाडूंना वश करून त्यांचे कान फुंकून त्यांनी या खेपेस आबांची कर्णधाराच्या जागीं निवडणूक करविली होती. आप्पांचा या निवडणुकीला पूर्ण विरोध होता. त्यांनी

तिसऱ्याच एका खेळाडूचें नांव सुचविलें आणि आतापर्यंत आप्पांनी सुचविलेल्या नांवाला कुणीच हरकत घेत नसत. पण कसें कुणास ठाऊक— एका खेळाडूने आबांचें नांव कर्णधारांच्या जागेसाठीं सुचविलें, दुसऱ्या एकाने त्याला पाठिंबा दिला आणि आप्पांच्या तीव्र विरोधाला न जुमानतां आबा कर्णधाराच्या जागीं निवडून आले.

आता आप्पा काय करतात इकडे प्रतिपक्षांतील लोकांपैकी बहुतेकांचे डोळे लागले. बहुधा ते तो संघ सोडून दुसऱ्या संघाला मिळणार असाच कयास बांधला. आबाचें नाक ठेचण्यासाठीं बहुधा ते रत्नागिरी संघाचें कर्णधारत्व स्वीकारून मैदानावर सामना द्यायला उतरणार अशीही कुणकुण पसरूं लागली. या वर्षीं ते खेळणारच नाहीत अशी कित्येकांनी बातमी पसरविली. या वर्षीचे सामने अटीतटीचे होणार होते. रत्नागिरी संघाने बाहेर गांवाहून दोन ख्यातनाम फलंदाज व दोन गुगली बोलर्स बोलावले होते. त्यामुळे त्या टीमचें पारडें यावर्षीं अतिशय जड झालें होतें. अशा वेळीं आप्पांनी संघ सोडला किंवा दुसऱ्या संघातर्फे ते खेळावयास तयार झाले तर नवयुग संघाला यशाची बिलकूलच आशा नव्हती. कर्णधारत्वाचा मान आप्पासारख्या कसलेल्या खेळाडूला द्यायचें सोडून आबासारख्या फक्त गोलंदाजींत प्रवीण असलेल्या खेळाडूला देण्यांत पुष्कळाच्या मतें अन्याय झाला होता. त्या अन्यायाला आप्पा कसें तोंड देतात ह्याकडेच सर्वांचे डोळे लागले होते.

पण पहिल्याच सामन्याच्यावेळीं नवयुवक संघाच्या इतर खेळाडूंबरोबर आप्पाहि क्षेत्ररक्षणासाठी उतल्याचें दिसतांच सर्वांना आश्चर्याचा एकदम धक्का बसला. पुष्कळांचे पुष्कळ तर्क चालू लागले. "छेहो! टीममध्ये असलं म्हणून चांगलं खेळलं पाहिजे असं थोडंच आहे? अहो— आबा त्यांचा एवढा कट्टर शत्रू—तो कॅप्टन असतांना टीमला तो यश मिळवून देणार होय? नांवच सोडा!—पहिल्या बॉलला त्यांनी स्वतःची विकेट नाही दिली तर नांवच बदलून देईन." अशा तऱ्हेची भाषा टीकाकाराच्या व प्रतिपक्षियांच्या तोंडून ऐकूं येऊं लागली.

पण त्यालाहि ९० धावा काढून आणि विजय मिळवून देऊन

आप्पांनी चांगलेंच उत्तर दिलें. पण टीकाकारांचीं तोंडें बंद करतां येतात थोडींच ? याहि घटनेवर त्यांची टीका तयारच होती. या साध्या मॅचमध्ये खेळून फुकटफाकट मोठेपणा घ्यायला त्याचें काय जाते ? आतां फायनलला रत्नागिरी टीमच्या विरुद्ध ही टीम आली म्हणजे पहा म्हणावें. नेमके त्याच सुमारास आप्पा आजारी पडणार—पण आबा कप्तान असल्यावर ते 'नवयुवक' संघाला यश मिळवून देतील होय ? नांवच सोडा.

पण टीकाकारांना व प्रतिपक्षियांना त्याहि दिवशीं धक्का बसायचा होता. आप्पा अगदीं धडपणें त्या दिवशीं सामना खेळायला आले होते. दोन्ही संघांतील खेळाडू उत्कृष्ट असल्यामुळे सामना गाजणार यांची सर्वांना खात्री होती. त्यामुळे मैदानावर अलोट गर्दी लोटली होती. आणि त्यात आप्पा व आबांच्या वैमनस्याची व मतभेदाची माहिती सर्वांनाच असल्याने ते यावेळीं काय करतात इकडेहि सर्वांचें लक्ष होतं. ते खेळणारच नाहींत असें पुष्कळांना वाटत होतें— आणि त्यामुळे क्षेत्ररक्षणाकरितां 'नवयुवक' संघ मैदानावर उतरला त्यांमध्ये आप्पा असलेले पहातांच प्रेक्षकांनी आनंदाने टाळ्या वाजवून त्यांचें स्वागत केलें. 'आप्पा खेळताहेत—आता सामन्याला रंग चढणार—' अशी आता बहुतेकांना खात्री वाटूं लागली.

—आणि सामना अपेक्षेपेक्षाहि जास्त रंगला. रत्नागिरी टीमने पहिल्या इनिंगला २३५ धावा काढल्या. आबाची गोलंदाजी परिणामकारक झाल्याने त्यांतील दोन उत्कृष्ट खेळाडूंना शून्यावरच परतावें लागलें होतें. 'नवयुवक' संघाने सुरवात अतिशय वाईट केली. दहा धावांत त्यांनी तीन बळी दिले. पण पुढें आप्पा आणि दुसरा एक चांगला फलंदाज यांची जोडी जमली. आणि गोलंदाजींत वारंवार फेरफार करूनहि रत्नागिरी टीमला ती जोडी फोडतां येईना. त्या दोघा खेळाडूंनी प्रेक्षकांच्या नजरेचें अक्षरशः पारणें फेडलें. अप्पा तर अंगांत अवसान आल्यासारखे चेंडू सिमेपार पिटाळीत होते. दोनशेपर्यंत या दोघांनी धावांची संख्या नेल्यावर चवथा गडी बाद झाला. स्वतःचें दीड शतक पूर्ण झाल्यावर आप्पांनी सहाचा टोला मारण्यासाठी चेंडू उडवला—आणि सीमेवर असलेल्या क्षेत्ररक्षकाने तो पकडल्यावर ते टाळयांच्या गजरांत तंबूकडे परतले.

आप्पावर अभिनंदनाचा वर्षाव तर होत होताच-पण खुद्द कप्तानाने त्यांना सामोरे जाऊन त्यांचें अभिनंदन करावें अशी लोकांची अपेक्षा होती. पण आबा कसले मानी ! एकीकडून त्यांना आप्पाविषयीं कौतुक वाटत होतेंच—पण दुसरीकडून त्यांना त्यांचा अभिमान अडवीत होता. त्यांनी 'Well Played Kulkarni' म्हटलें—पण तें इतक्या हलक्या आवाजांत कीं त्यांचें त्यांना तरी ऐकूं आलें कीं नाहीं कोण जाणें पण तंबूत शिरल्यावर आप्पांनी त्यांच्याकडे नजरहि टाकली नाही. आपल्या कप्तानगिरीचा हा अभिमान आहे असेंच आबांना वाटलें. पण कसाबसा त्यांनी तो राग गिळला

पहिल्या इनिंगमध्ये 'नवयुवक' संघाचे एकशेंवीस रन्स जास्त झाले होते. आणि दुसऱ्या इनिंगमध्ये रत्नागिरी टीमने २५० धांवा काढल्यामुळे आता १३१ धावा विजय मिळविण्यासाठी 'नवयुवक' संघाला पाहिजे होत्या. आणि त्या मिळविणें त्या संघाला कठीण नव्हतें. विजय जवळ जवळ हातांत आला, अशाच आविर्भावाने आणि वृत्तीने आबा वावरत होते. पहिली जोडी खेळावयाला गेली—पांचसहा धांवा करून पहिला गडी परतला आणि टाळ्यांच्या गजरांत आप्पा बाहेर पडले.

परन्तु 'काय झालं' हें समजण्यापूर्वींच आप्पा मॅटवर पालथे पडले. प्रतिपक्षाच्या गोलन्दाजाकडून अत्यंत वेगाने येणारा चेंडू सरळ न येतां त्यांच्या कानशिलावर जोरांत बसला आणि आप्पा एकदम खालीं बसले.

जिकडे तिकडे एकच गोंधळ उडाला—डॉक्टर पिच्वर आले—चौघांनी उचलून आप्पांना तंबूंत आणले—पुढला गडी खेळावयास गेला अन् खेळ सुरू झाला

परन्तु आप्पाच्या अपघाताने डावाला अपशकूनच झाल्यासारखें झालें. त्या गोलन्दाजाविषयीं प्रत्येक खेळाडूने धास्ती घेतली, आणि जो तो भिऊन खेळूं लागला कीं गोलन्दाजाचें चांगलेंच फावतें. तसाच प्रकार त्यानंतरच्या खेळांत झाला. चांगले चांगले समजले जाणारे खेळाडू दोनतीन धावा काढून अगदीं सोप्या रीतीने आपला बळी देऊन तंबूकडे परतूं लागले. खेळाचा रंग आता एकदम पालटला. आबाच्या तोंडचें एकदम पाणी पळालें. अगदीं तोंडापर्यंत आलेला विजय निघून जातो आहे असं

त्यांना स्पष्ट दिसूं लागलं. आणि सातवा गडी बाद होऊन परत आल्यावर जेव्हां फळ्यावर पंचावीसाचाच आंकडा त्यांना दिसला तेव्हां त्यांची कंबरच खचली.

प्रेक्षकांत तर या प्रकारानें विलक्षण खळबळ उडाली. आप्पा जखमी होऊन तंबूत गेल्यानंतर झालेला हा खुर्दा पाहिल्यावर प्रत्येकजण दिङ्मूढच होऊन गेला होता. "आप्पा या वेळीं असते तर—" असे शब्द प्रत्येकाच्या तोंडून बाहेर पडूं लागले. आप्पांच्या टीकाकारांना आतां ऊतच आला. "सांगितलं नव्हतं तुम्हांला? अहो, हे सगळे डावपेच आहेत. अगदीं शेवटल्या क्षणापर्यंत विजयाची आशा लावायची आणि शेवटीं एकदम सोडून द्यायचें हें धोरण आहे. नाही तर आप्पाला खरोखर लागलें आहे म्हणतां काय? ढोंग आहे ढोंग. तरी आम्ही म्हणत होतों की आबाला कसला विजय मिळवून देणार हा!" असे पडसाद मधून मधून प्रेक्षकांतून उमटत होते

इकडे आप्पा—डॉक्टरांनी बॅंडेज बांधल्यावर बाहेर कसला गलबला चालला आहे हें पहाण्यासाठी डॉक्टरांच्या सल्ल्याविरुद्ध बाहेर आले. सातवा गडी बाद होऊन नववा निघण्याच्या तयारींत आहे—फळ्यावर फक्त पंचविसाचा आकडा दिसत आहे. हें सारें पाहिल्यावर धक्काच बसला त्यांना! ताबडतोब खुर्चीवर बसून ते ओरडले, "बॉय—ए—बॉय, पॅड् लाव इधर!" आश्चर्यानें तंबूतील सारेजण पाहूं लागले त्यांच्याकडे! त्यांना लागलेल्या माराचें स्वरूप गंभीर आहे याची कल्पना होती पुष्कळांना. डॉक्टर तेवढ्यांत बाहेर आलेच होते. ते एकदम म्हणाले, "छे छे! शक्य नाही! इतक्या गंभीर स्वरूपाचा मार बसला असतांना मी तुम्हांला जाऊं देणं शक्य नाही खेळायला!"

पण छे! आप्पा कुणाचंच ऐकायला तयार नव्हते! हट्टानें त्यांनी पॅडस् बांधायला सुरवात केली होती. इतक्यांत नववा गडी बाद होऊन परतला—आबा खेळायला निघाले. पण जातांना आप्पाकडे पाहून ते म्हणाले, "आप्पा मॅच गेली तर गेली—पण अविचार करूं नका."

" जा-जा, अगोदर जपून खेळ नीट." आप्पा पॅड्स बांधीत अर्ध-वट त्याच्याकडे पहात म्हणाले. आता ते सर्व कांही विसरले होते! मॅच् हातांतून जाते आहे—ती ओढून काढायची या एकाच कल्पनेने त्यांना जोर चढला होता—नववा गडी बाद होऊन परत आल्यावर त्यांनी मैदानावर पाऊल टाकलें तें त्याच उमेदींत.

—आणि त्या दिवशीं रत्नागिरीकरांना एक अभिनव दृश्य पहावयास मिळालें. परस्परांची निंदा करणारे-परस्परांशीं तीन वर्षांत कधी न बोललेले आबा आणि आप्पा विजयश्री आपल्या बाजूकडे खेचून आणण्यासाठी जिवाचें रान करीत होते. चेहऱ्याला बॅंडेज बांधलेले आप्पा हातांत बॅट घेऊन पिच्कडे जातांना पाहून सर्वांनी आरोळ्या ठोकल्या होत्या-'Buck up Appa'च्या निनादांनी मैदान दुमदुमून गेलें होतें—तरी पण विजयश्री कितपत हातीं येईल याची सर्वांना शंकाच होती. एकतर आप्पा जखमी होते—त्यांच्या हातून कितपत तडफदार खेळ होईल हा प्रश्न होता. अन् शिवाय त्यांनी जरी कितीहि चांगलें खेळायचें मनांत आणलें तरी आबा कितपत टिकाव धरतील हा प्रश्नच होता. आबा फक्त गोलन्दाज होते. फलन्दाज या नात्याने त्यांची योग्यता अकरावा जाण्याचीच होती. आणि अद्याप विजय मिळवायला १०६ पाहिजे होते. अशक्य शक्य झालं तरच—

आणि आप्पांनी अशक्यच शक्य करून दाखविलें. त्यांनी आपल्या तडफदार खेळाने गोलंदाजी तर फोडून काढलीच पण डावपेचहि लढवाव-यास सुरवात केली. आबाला फार वेळ गोलंदाजीला तोंड द्यावें लागूं नये म्हणून सहाव्या चेंडूला ते एक धाव काढून दुसऱ्या बाजूला येऊं लागले. प्रतिपक्षांनी जंगजंग पछाडले. पण त्याचा कांही उपयोग होऊं शकला नाही. धावांचा आकडा हळूहळू चढत होता. श्वास रोखून प्रेक्षक सामना बघत होते. आबाला तर केवळ आश्चर्यच नव्हे तर आप्पाविषयीं आदर—प्रेम सर्व कांही वाटूं लागलें होतें. एवढा मार लागला असतांना केवळ विजय मिळावा म्हणून डॉक्टरांच्या व इतरांच्या निषेधाला न जुमानता मैदानावर उतर-लेला आप्पाच खरा खेळाडू याची खात्री पटली त्यांना. आप्पांचा तडाखा पाहून तेहि हळूहळू धीट बनून प्रतिपक्षाच्या गोलंदाजीला तोंड देत होते.

पण सर्व भार अक्षरशः आप्पांनी उचलला होता. धावांचा आंकडा ९० वर आला– हळूहळू शंभरावर गेला. शंभराच्या टाळ्यासाठी सुद्धा लोकांनी हात उचलले नाहीत. श्वास रोखून ते बघत होते. विजयाला फक्त सहाच धावा कमी होत्या. त्या ओव्हरमधील शेवटचा चेंडू आप्पाकडे फेकला जात होता—

—आणि प्रेक्षकांना 'काय झालें' हें कळण्यापूर्वीच चेंडू आकाश-मार्गाने प्रेक्षकांमध्ये येऊन पडला होता. चहूंकडून पिचवर एकच गर्दी उसळली पहिल्याने आबाने हातांतील बॅट फेकून दिली व धावत जाऊन त्यांनी आप्पाला कडकडून मिठी मारली.

पण आप्पांचा उसना आवेश आतां ओसरला होता व ते शुद्ध जाऊन आबाच्या हातांत पडले होते.

त्या दिवशीं संध्याकाळीं बराच मोठा जमाव बंगल्याच्या दिशेने येत असलेला पाहून आबाची व आप्पांची बायको बाहेर आली. त्यांत एका उघड्या टॅक्सींत अप्पा आणि आबा एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून बसल्याचें अभिनव दृश्य पाहून त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला.

त्या रात्रीं आबा, आबाची बायको व त्यांचीं मुलें यांचा मुक्काम आप्पांच्या बंगल्यांतच होता. रात्र संपली तरी त्यांच्या गप्पा सपल्या नाहीत. जणूं तीन वर्षांच्या उपासाचें पारणेंच तीं सारींजण फेडीत होतीं.

दुसरे दिवशीं दोन बंगल्यामधील मध्यंतरीं बुजविलेली गडग्यांतलि वाट पुन्हा मोकळी करण्यांत आली–आणि आबा व आप्पा यांच्या बंग-ल्यांतून पूर्ववत आवकजावक सुरू झाली. रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत आप्पांच्या व आबांच्या गप्पागोष्टी पुन्हा ऐकूं येऊं लागल्या.

क्रिकेटने निर्माण केलेलें त्यांच्या जीवनांतील वादळ शेवटीं क्रिकेटनेच शमवलें अन् त्यांच्या जीवनाचा प्रवाह पूर्ववत् संथ रीतीने सुरू झाला.

● ● ●

## अखेरची आहुति : : ३

सहावी 'ब'च्या संस्कृतच्या वह्या तपासण्यांत आपटे मास्तर गुंग होऊन गेले होते. टण-टण टण...घड्याळांत साताचे ठोके पडले वास्तविक नित्यनियमाप्रमाणे त्यांचीं ही फिरायला जाण्याची वेळ. पण घड्याळाने दिलेल्या इशाऱ्याकडे त्यांचें लक्षहि नव्हतें. अद्याप तीन वर्गांचे वह्यांचे गठ्ठे तपासावयाचे पडले होते.

गठ्ठयांतील एकएक वही ते घेत, विद्यार्थ्यांने लिहिलेल्या पाठावरून डोळे फिरवीत, बाकीचें काम आपोआप तांबड्या पेन्सिलीकडून होई. यंत्राप्रमाणे त्यांचें काम चाललेलें होतें; पण त्यांचे विचार दुसरीकडे भरकटत होते.

गेल्या पंचवीस वर्षांचें सिंहावलोकन करण्यांत त्यांचें मन गुंतलें होतें. गेल्या पंचवीस वर्षांचा काळ...काळ कसला ? यज्ञसत्रच होतें त्यांच्या जीवनाचें तें ! आणि त्या होमकुंडांत आतांपर्यंत त्यांच्या आवडीनिवडींची, त्यांच्या उमेदीची आहुति पडत आली होती. एकोणीसशें वीस सालीं मोठ्या उत्साहाने अन् मोठ्या महत्त्वाकांक्षेने शाळेच्या विश्वांत पाऊल टाकणारा आपटे आणि पंचेचाळीस सालांतील प्रवाहपतित, उत्साहहीन अन् आकांक्षांची राख झालेला आपटे ! दोन ध्रुवांचें अंतर होतें या दोघांत !

आपटे कसला ? एकोणीसशें वीसमधील आपट्यांचें भूतच होतें हें वह्या तपाशीत बसलेलें !

तपासलेली वही त्यांनी खाली टाकली अन् दुसरी उचलण्यापूर्वी क्षणभर त्यांनी तांबडी पेन्सिल खाली ठेवली. मागच्या तक्क्याला ते टेकून बसले व ‘ टक् टक् ’ करीत आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देणाऱ्या घड्याळाकडे त्यांनी दृष्टि लावली.

पंचवीस वर्षे त्यांच्या जीवनाची धडपड तें घड्याळ पाहात आले होतें. शाळेच्या पहिल्या दिवशीं अकराचे ठोके त्याने जेव्हा दिले त्यावेळीं आपटे मास्तरांची उडालेली गडबड, धांदल अन् त्यांचा उत्साह त्याने पाहिला होता. तोच त्यांचा उत्साह दहा वर्षे सतत टिकलेला त्याला दिसला होता ! अकराव्या वर्षी शाळेच्या सुरवातीलाच केव्हातरी ते चिडून आलेले अन् रागाच्या भरांत त्यांनी पुस्तकें फेकून दिलेली त्याने पाहिलीं होतीं ! त्यानंतर पूर्वीची धांदल त्याला कधीच दिसली नाही. आणि आता तर अकराचे ठोके घड्याळाने दिले की त्यांच्या कपाळावर आठ्यांचें जाळें पसरूं लागे. या पंचवीस वर्षांतील त्यांच्या अंतःकरणाची तळमळ आणि त्यांच्या मनाचा उद्वेग त्यांच्या सूक्ष्म हालचालींच्या रूपाने त्याला दिसला होता. पण बोलून-चालून यंत्राचें हृदय होतें त्याचें ! त्यांच्या अंत.करणांतील उद्वेगाला आपल्या ‘ टक् टक् ’ आवाजाने साद देण्यापलीकडे तें दुसरें काय करूं शकणार ?

त्या घड्याळाकडे पाहतां पाहतां आपटे मास्तरांना आपल्या सुरवातीच्या उत्साहाची आठवण झाली. पदवीधर झाल्याबरोबर शिक्षणक्षेत्रांत शिरायचें आणि आपल्या आवडत्या विषयाचें, संस्कृतचें अध्यापन करायचें ! आणि तें करतांना आपल्या प्राचीन वाङ्मयाची, प्राचीन बुद्धिमत्तेची, प्राचीन वैभवाची ओळख विद्यार्थ्यांना करून द्यायची; भारतीय संस्कृतीविषयी त्यांच्या मनांत आत्यंतिक आदर निर्माण करायचा आणि संस्कृत भाषा, संस्कृत वाङ्मय आणि संस्कृतांतील तत्त्वज्ञान यांविषयीं त्यांच्या मनांत मोठा अभिमान निर्माण करायचा, या महत्त्वाकांक्षेने ते शिक्षणक्षेत्रांत शिरले होते. त्यांचा स्वतःचा संस्कृतचा अभ्यास दांडगा होता. जुन्या शास्त्री-पंडितांबरोबर त्यांनी वेद, उपनिषदें, सूत्रें वगैरेंचा अभ्यास केला होता.

काव्यें आणि नाटकें तर त्यांचीं अत्यंत आवडतीं. कालिदासाचें रघुवंश, मेघदूत व शाकुंतल, भवभूतीचें उत्तररामचरितम्, माघाचें शिशुपालवध हीं त्यांनी किती वेळां वाचलीं असतील याचा पत्ताच नव्हता! करमत नसलें की वरीलपैकी कोणतेंहि एक पुस्तक ते उघडीत व वाचूं लागत अन् त्यांतच त्यांना अननुभूत आनंद मिळे.

आपल्यांतील ही संस्कृतची आवड आपल्या शिष्यांत निर्माण करायची या ध्येयानेच ते शालेय जगांत शिरले होते. आणि सुरुवातीच्या दहा वर्षांत उत्कृष्ट शिक्षक म्हणून त्यांनी ख्याति पण मिळविली होती. चवथींत विद्यार्थी त्यांच्या हाताखालीं आला म्हणजे तेव्हापासून त्याच्यावर त्यांचे संस्कार सुरू होत ते थेट तो प्रवेशपरिक्षेला बसेपर्यंत! केवळ शाळेंतल्या तासांवरच त्यांचें भागत नसे. ते त्यांना शाळा सुटल्यावर थांबवतील, रविवारीं शाळेंत बोलावतील, उन्हाळ्याच्या व दिवाळीच्या सुटींत शाळेंतें वर्ग उघडतील, थोडक्यांत म्हणजे आपले शिष्य संस्कृतमध्यें पारंगत व्हावे म्हणून ते जीव टाकतील.

विद्यार्थीहि त्यांना उत्साही भेटलेले असत व शाळेचे मुख्याधिकारी त्यांच्या उत्साहाचें कौतुक करणारे होते. त्यामुळे वीस ते तीस हीं दहा वर्षें ती शाळा म्हणजे संस्कृत अध्ययनाचें पीठच बनली होती.

पण एकतीस सालीं नवे शाळाधिकारी आले आणि सर्व मनु पालटला! हे नवे अधिकारी नवीननवीन वेडें डोक्यांत घेऊन आले होते. "शाळेच्या तासांच्या बाहेर मुलांच्या बुद्धीला अधिक ताण द्यायचा नाही" हें त्यांपैकीं एक वेड होतें. अन् त्यामुळे प्रथम आल्याबरोबर त्यांनी आपटे मास्तरांचे अधिक तास बंद करविले. ते स्वतः शास्त्राचे पदवीधर असल्याने संस्कृतसारख्या जुन्या व त्यांच्या दृष्टीने निरुपयोगी भाषांचें प्रस्थ जितकें कमी होईल तितकें त्यांना पाहिजे होतें. त्यामुळें आपटे मास्तरांचा व त्यांचा पहिला खटका उडाला. अन् विशेषतः शाळेंतील वर्ग बंद करविल्यावर आपटे मास्तरांनी घरीं विद्यार्थी बोलवायला सुरुवात केली हें कळल्यावर तर ते अधिकच संतापले व हळुहळू आपटे मास्तरांचें महत्त्व कमी करण्याची कारवाई करायला त्यांनी सुरुवात केली. आपटे मास्तरांची

विद्यार्थीप्रियता पहावत नसलेले असे कांही विघ्नसंतोषी शिक्षक शाळेंत होतेच. त्यांना त्यांनी हाताशीं धरलें आणि विद्यार्थ्यांत आपटे मास्तरां-विरुद्ध प्रचार करण्यास हळूहळू सुरुवात केली. वास्तविक शाळाधिकाऱ्याने अशा गोष्टींपासून अलिप्त असायला हवें होतें. पण आपटे मास्तरांशीं खटका झाल्यापासून व आपल्या हुकुमाला न जुमानतां घरीं त्यांनी वर्ग घ्यायला सुरुवात केल्यापासून त्यांनी आपटे मास्तरांविरुद्ध दंशच धरला होता. आणि शाळाधिकाऱ्यांचा दंश हा सगळयांत भयंकर असतो याचें प्रत्यंतर आपटे मास्तरांना लवकरच आलें. संस्कृतच्या जोडीला विकल्प म्हणून त्यांनी अर्धमागधी भाषा सुरू केली आणि त्याचा प्रचार सुरू केला. इतकेंच नव्हे, तर आपल्यांकडील संस्कृत काढून त्याबद्दल त्यांना इतर विषय द्यायला सुरुवात केली.

आपटे मास्तरांवर मात्र याचा परिणाम विलक्षण झाला. ज्या संस्कृता-वर आपण जिवापलीकडे प्रेम करतों तिची मुलांनी इतकी उपेक्षा कां करावी हेंच त्यांना समजेना ! विद्यार्थ्यांत उत्साह तर राहोच, पण साधी अभ्यास करण्यांची प्रवृत्ती सुद्धा दिसून येईना. त्याबद्दल कांही बोलावें तर मुलांकडून दुरुत्तरें येऊं लागलीं. आपटे मास्तरांच्या कारकीर्दीत मुलांकडून दुरुत्तरें मिळणें हा प्रकार नवीनच होता ! प्रथम त्यांना यांतील गूढ कळेना, पण हळूहळू परिस्थितीची त्याना जाणीव होऊं लागली. आणि तेव्हापासून त्यांच्या स्वभावांत निराळेंच स्थित्यंतर घडून आलें. ते हळूहळू चिडखोर बनले.

सातआठ वर्षांत या शाळाधिकाऱ्याने आपटे मास्तरांचें व्यक्तिमत्व या विद्यार्थ्यांच्या जगांत पार मारून टाकलें होतें. 'चिडखोर अन् तापट शिक्षक' म्हणून विद्यार्थीवर्ग त्यांना ओळखूं लागला. त्यांच्या जिव्हाळ्या-कडे, अंतःकरणाच्या तळमळीकडे कुणीच बघेना. पूर्वीप्रमाणे विद्यार्थ्यांत संस्कृतची आवड निर्माण करण्याचा ते आटोकाट प्रयत्न करीत. पण विद्यार्थी बदलले होते, त्यांची वृत्ति बदलली होती अन् शाळेचा व प्रवेशपरिक्षेचा अभ्यासक्रम बदलला होता. कमींत कमी श्रमांत जास्तींत जास्त मार्क मिळविण्याची इच्छा विद्यार्थ्यांच्या मनांत निर्माण झाली होती आणि ती पुरविण्यांस निरनिराळ्या मार्गदर्शिका तयार असत. शिवाय विद्यार्थ्यांना

परिक्षेच्या पलीकडे दृष्टि देण्याची हौसच उरली नव्हती. त्यामुळे संस्कृत वाङ्मयाचा अधिकाधिक परिचय करून देण्याच्या आपटे मास्तरांच्या प्रयत्नांबद्दल विद्यार्थ्यांच्या तक्रारी सुरू झाल्या आणि शाळाधिकाऱ्याला पुन्हा एकदां त्यांना चार शब्द ऐकविण्याची संधि मिळाली.

लवकरच हे शाळाधिकारी बदलून त्यांच्या जागीं इंग्लंडहून डिप्लोमा घेऊन आलेला एक तरुण गृहस्थ आला. त्यानें एक नवीन वेड शाळेंत आणलें आणि ते म्हणजे ‘ प्रत्यक्ष ’ पद्धति. प्रत्येक विषयांत प्रत्येक शिक्षकाने या पद्धतीचा अवलंब केला पाहिजे असा हुकूमनामा सुटला. संस्कृतमध्ये प्रत्यक्ष पद्धति किती अशक्य व कृत्रिम आहे हें आपटे मास्तरांनी सांगूनहि त्यांना पटलें नाही. अध्यापन विषयांतील नवीन पदवीधर पुढे येऊन प्रत्यक्ष पद्धतीने संस्कृत घेऊं लागले. आपटे मास्तर हे जुन्या जमान्यांतले मास्तर ठरले. त्यांना शास्त्री ही संज्ञा देण्यांत येऊं लागली, आणि त्यांच्याशीं बोलतांना इतर तरुण शिक्षक कांहीसा कुचेष्टेचा स्वर आपल्या संभाषणांत आणूं लागले. आणि तेव्हापासून आपटे मास्तर शाळेविषयी अगदी उदासीन झाले. शाळेंत उत्साह दाखविण्यासारखें आता काय राहिलें होतें ?

पण एखाद्या शिक्षकाने शाळेविषयी कितीहि उदासीन रहायचे ठरवलें तरी स्वतःचा आवडता विषय शिकवायला लागलें कीं तो नकळतच त्यांत रंगून जातो आपटे मास्तरांचें तसेंच होई. ते विद्यार्थ्यांवर चिडत, रागावत, प्रसंगीं त्यांना शिक्षाहि देत. पण एकदा का संस्कृत शिकवायला सुरवात केली की ते इतर सर्व गोष्टी पार विसरून जात. हुषार विद्यार्थ्यांना त्यांच्या शिकविण्याचें रसग्रहण तेव्हाच होई. ते त्यांच्याशीं विषयांत तेव्हाच एकरूप होत आणि त्यांच्याकरितांच आपटे मास्तर शिकवीत होते. बाकीच्या विद्यार्थ्यांना ते सरळ ‘ अर्धमागधी ’ घेण्याचा उपदेश करीत.

वह्या तपासतांना हेच सर्व विचार त्यांच्या मनांत गर्दी करीत होते. वह्या तपासण्याचें काम यंत्राप्रमाणे चालूच होतें. शिक्षकाच्या अध्यापनाचें कौशल्य आणि यश इन्स्पेक्शनच्या वेळीं मुळी विद्यार्थ्यांच्या वह्यांवर अवलंबून असतें हें त्यांना चांगलें माहित होतें. वर्षभर कांही न शिकवितां

इन्स्पेक्शनच्या वेळीं मुलांकडून तीन चार उत्तरें काढून गृहपाठ निबंधादिकांच्या वह्या उत्तम अवस्थेंत दाखवून ‘ उत्कृष्ट शिक्षक ’ ठरलेले शिक्षक त्याच्या शाळेंत नव्हते थोडेच ? त्यांना स्वतःला तें ढोंग कधीच साधलें नाही.

मागे तक्क्यावर मान टेकून घड्याळाकडे पाहतांपाहतां हीं सारीं चित्रें त्यांच्या डोळ्यांसमोर येत होतीं. त्यांना वाटत होतें, किती स्वाभिमानशून्य हें जिणें आमचें ! ज्या गोष्टी पटतात त्या सांगण्याचें धाडस आमच्यांत नाही. इन्स्पेक्टरला पटणाऱ्या गोष्टी आम्हाला कां पटाव्या ? आणि आमची बाजू बरोबर असली तर त्याबाबत आम्ही त्यांच्याशीं कां भांडूं नये ? पण इन्स्पेक्टरशीं भांडण्याची कल्पना डोक्यांत येतांच ते हंसले. हो ! विनाकारण वेळ घालवतों आहोंत आपण. अद्याप चार गठ्ठे तपासायचे आहेत ! छे ! डोळे काय जळजळताहेत ! पण या तक्रारी या वेळीं नकोत...

इन्स्पेक्शनचा दिवस तर उजाडला. घड्याळाने आपल्या सवयीप्रमाणे अकराचे ठोके देऊन आपटे मास्तरांना शाळेची वेळ झाली असल्याची जाणीव दिली. कपाळाला आठ्या घालून आपटे मास्तरांनी घड्याळाकडे पाहिलें अन् कोट अंगावर चढवून ते घराबाहेर पडले.

शाळेंत जिकडेतिकडे धामधूम उडाली होती शिक्षकांच्या खोलींतसुद्धा थोडाफार फरक झाला होता. कांहींनी नवे कपडे घातले होते, कांही नेहमी धोतरांत येणारे सूट घालून आले होते. मुख्याधिकाऱ्यांच्या सूचनावजा नोटीसा फिरविण्यांत एकदोन गडी गुंतले होते. गडबड नव्हती फक्त विद्यार्थ्यांची ! कारण त्यांना माहित होतें, की इन्स्पेक्शन म्हणजे शिक्षकांची परीक्षा ! त्यामुळे शिक्षकांची होणारी धांदल ते जरा गमतीने पाहात होते.

या सगळ्या गोष्टी आपटे मास्तरांना सरावाच्या झाल्या होत्या. हो ! नाही म्हणायला नावीन्य वाटण्यासारखी एकच गोष्ट यंदाच्या इन्स्पेक्शनमध्ये होती. ती म्हणजे यंदाचा मुख्य इन्स्पेक्टर शाळेचा माजी विद्यार्थी होता. पण आपटे मास्तरांनी त्याकडे कांहीच लक्ष दिलें नाही. नेहमीच्या जागीं कोपऱ्यांत तक्याला टेकून ते बसले. गड्याने आणून दिलेल्या नोटिसा वाचून त्यांवर सही केली. पहिली घंटा झाल्यावर कपाटांतील पुस्तकांपैकीं एक पुस्तक काढलें अन् ते वर्गावर निघाले. इन्स्पेक्शन म्हणजे विशेष कांही

असतें असें ते कधीच समजत नसत. आणि तीच त्यांची वृत्ति आज होती.

आणि पहिल्याच तासाला सहावीच्या वर्गावर संस्कृत घेत असतां त्यांना इन्स्पेक्टरांनी गाठलें! मुख्याधिकाऱ्याने प्रथम त्यांची ओळख करून दिली. आपट्यांची नजर इन्स्पेक्टरच्या चेहऱ्याकडे वळली अन् ते एकदम दचकले. निःसंशय साटेच होता तो! १९११ सालीं सहावीमध्ये त्यांच्या वर्गात होता. पण नुसता त्यांचा विद्यार्थी असता तर त्याबद्दल त्यांना इतकें दचकायचें कारण नव्हतें. उलट आपला शिष्य या पात्रतेला चढला म्हणून समाधानच वाटलें असतें त्यांना! पण त्या वेळीं अतिशय वाह्यात विद्यार्थी होता तो! त्यावेळच्या शाळाधिकाऱ्याने आपटे मास्तरांना नेस्तनाबूत करण्यासाठी जे विद्यार्थी हाताशीं धरले होते त्यांत तो प्रमुख होता. संस्कृत भाषेविषयीं अपमानपर उद्‌गार काढल्याबद्दल आपटे मास्तरांनी त्याला वर्गात चांगलेंच चोपलें होतें आणि तें प्रकरण बरेंच चिघळलेंहि होतें.

त्यांचा हा गोंधळ इन्स्पेक्टरनी ओळखला की काय कोण जाणे. ते क्षणभर स्वतःशीं हसले व खिशांतील बारकी वही काढून त्यांवर कांही टिपणें करायला सुरवात केली नंतर त्यांनी टेबलावरील वह्या हातांत घेऊन त्या पाहायला सुरवात केली. त्यांतील कांही गोष्टी आपल्या छोट्या वहींत उतरून घेतल्या. सुमारें अर्ध्या तासाने ते वर्गावरून उठून गेले.

अपेक्षेप्रमाणे मधल्या सुट्टींत त्यांना ऑफिसमध्ये बोलावणें आलें. आपणांला आता काय ऐकावें लागणार याची त्यांना पूर्ण कल्पना होती. आणि तशी मनाची तयारी करूनच ते ऑफिसमध्ये जाण्यास निघाले.

ऑफिसमध्ये इन्स्पेक्टर एकटेच बसले होते. आपटे येतांच इन्स्पेक्टर-साहेबांनी त्यांचें जरा हसून स्वागत केलें आणि त्यांना बसावयास खुर्ची पुढे केली.

"मला आपण ओळखलं असेलच." साटे सस्मित त्यांच्याकडे पाहात म्हणाले.

"हो तर! आपल्या हाताखालून गेलेल्या विद्यार्थ्यांची ओळख कुणी विसरतं का?" आपटे मास्तरांनी हसून उत्तर दिलें. "मला वाटतं बत्तीस

सालीं आपण माझ्या वर्गात होतां, नाही? मी संस्कृत शिकवीत होतों तुम्हाला त्या वेळीं."

"हो ना! आठवतं मला तें!" साठे म्हणाले, "आणि अद्याप शिकविण्याची पद्धतहि तीच दिसते आहे. या तेरा वर्षांत अध्यापनपद्धतींत काय काय सुधारणा झाल्या आहेत याची दखल घेतलेली दिसत नाही तुम्ही!"

"आम्ही आता जुन्या जमान्यांत जमा झालों!" संभाषणाचा रोख कुणीकडे वळतो आहे हें ओळखून आपटे म्हणाले, "नवीननवीन तरुण लोक पुढं येऊन नवीननवीन प्रयोग करीतच आहेत की!"

"पण शिक्षणक्षेत्रांत जुन्या जमान्यांत कुणीच राहूं शकत नाही मिस्टर आपटे!" साठे 'मिस्टर आपटे' या शब्दावर जोर देत म्हणाले. 'मिस्टर आपटे' या संबोधनापासून जणू त्यांना विशेष आनंदच मिळत होता. "अध्यापनक्षेत्रांत प्रत्येकानं आपलं मन ताजं आणि नवीन कल्पना उचलण्यास तयार असं ठेवलं पाहिजे. आदर्श शिक्षकानं नेहमी काळाप्रमाणं बदलत असलं पाहिजे. जुन्या, तुमच्या लहानपणच्या वेळच्या अध्यापनाच्या पद्धति या पंचेचाळीस सालांत सुरू करूं असं जर तुम्हीं म्हणूं लागलांत तर तें आज कसं चालेल?"

आपटे यावर कांहीच बोलले नाहीत. आज पांच वर्षे ते हेंच सारखें ऐकत होते. पण आजचें हें व्याख्यान त्यांना जरा विशेषच जाणवलें आपला एके काळचा विद्यार्थी, शिक्षणक्षेत्रांत शिरून ज्याला सात आठ वर्षें झालीं असतील नसतील, असा कालचा पोर पंचवीस वर्षें सतत अध्यापनांत घालविलेल्या व सेवानिवृत्त होण्याच्या पंथाला लागलेल्या जुन्या शिक्षकाला उपदेशाचे चार शब्द ऐकवतो हा खरोखर दैवी उपरोध होता! पण अधिकाराची खुर्ची माणसाला काय बोलायला लावील याचा कांही नेम असतो थोडाच!

"आज तुमचा पाठ मी पाहिला." थोडा वेळ थांबून साठे बोलूं लागले, "अन् अशाच पद्धतीनं तुम्ही नेहमी शिकवित असाल तर किती नुकसान करतां तुम्ही विद्यार्थ्यांचं याची कल्पना आहे तुम्हांला?"

"काय चुकलं होतं माझ्या आजच्या पाठांत?" आपला राग मनांतल्या मनांत गिळीत आपटे मास्तरांनी विचारलें.

"काय चुकलं होतं?" साठे म्हणाले, "अहो, सगळंच चुकलं होतं! काय बरोबर होतं हें विचारा मला! आज जी जी माहिती मुलांना तुम्ही स्वतः सांगितली, जे नियम तुम्ही स्वतः सांगितले, ते मुलांकडून काढून घेतां आले असते तुम्हांला. भाषांतर करतांना मुलांचं चुकलं तर मुलांनीच तें दुरुस्त केलं पाहिजे. पण पटकन् तुम्ही स्वतःच दुरुस्त करून मोकळे झालांत! एकेका शब्दाला पांचपांच सहासहा प्रतिशब्द सांगून सामान्य मुलांना तुम्ही गोंधळून सोडीत होतां. त्यापेक्षा एक शब्द त्यांच्या मनांमध्ये नीट ठसला की नाही हें पाहायला पाहिजे होतं तुम्ही! विद्यार्थ्यांना प्रयत्न करायला लावणं, हें आजच्या शिक्षणाचं खरं कार्य आहे. पण सगळ्या गोष्टी स्वतःच सांगून तुम्ही त्यांच्या विचारांची वाढ खुंटवीत होता."

"तुम्ही म्हणता त्या सगळ्या गोष्टी इतर विषयांच्या अध्यापनांत ठीक आहेत." आपटे शक्य तितका संयम ठेवत सांगूं लागले, "पण संस्कृतची गोष्ट अजिबात निराळी आहे. संस्कृत ही मृत भाषा आहे आणि ती शिकवितांना विचार करायला लावण्यापेक्षा त्यांना समजावून देण्याची दृष्टीच स्वीकारली पाहिजे. विचार करायला ते लागतील—पण केव्हा? ज्या वेळीं संस्कृतचं वाङ्मयभाडार त्यांच्यापुढं खुलं होईल आणि त्याचा ते आस्वाद घेऊं लागतील तेव्हा! पण तसं सामर्थ्य यायला प्रथम पाया हा शास्त्रशुद्ध झाला पाहिजे आणि त्यासाठीं पुष्कळ गोष्टी शिक्षकानंच त्यांना समजावून द्यायला हव्यात. संस्कृत व्याकरणांत नियम व त्याला अपवाद इतके आहेत, की विद्यार्थ्याला विचार करायला त्यांत सोडलं की त्यांचा गोंधळ उडून जाईल! आणि म्हणून त्याला हाताला धरून या अज्ञात प्रदेशांतील वाटा अन् पायवाटा त्याला दाखवायला हव्यात. नियम व अपवाद समजावून देतांना कांही गोष्टींचीं कारणं त्याला विचारतां येणार नाहीत. शिक्षकाच्या शब्दांवर विश्वास ठेवूनच त्यानं त्या गोष्टीचा स्वीकार केला पाहिजे."

"अस्सं!" साठे म्हणाले, "आंधळ्याला जशी आपण वाट

दाखवतों, तशी विद्यार्थ्यांना हात धरून वाट दाखवायची हें तुमचं अध्याप-नांतील नवीन तंत्र दिसतय् ! मुलांची विचारशक्ति आंधळी करून सोडण्याचं छानच तंत्र आहे की हें ! ”

“ मला तुमच्या तंत्राबिंत्राच्या भानगडी कळत नाहीत. ” आपटे मास्तरांच्या आवाजांत जरा चिडखोरपणा येऊं लागला होता “ मला अध्यापनाचं एकच तंत्र माहीत आहे. आणि तें म्हणजे जिव्हाळा. शिक्षकाला आणि विद्यार्थ्याला त्या विषयाबद्दल पूर्ण जिव्हाळा वाटणं, तो विषय शिकतांना अन् शिकवितांना दोघांनी त्याच्याशीं एकरूप होणं, हेंच यशस्वी अध्यापनाचं मी एकमेव तंत्र समजतों. हा जिव्हाळा त्यांत नसेल तर कितीहि तांत्रिक कसरती शिक्षकांनी केल्या तरी त्याचा कांही उपयोग व्हायचा नाही. आज पंचवीस वर्षं मी हें तंत्र उपयोगांत आणतों आहे आणि त्याच्या यशाबद्दल मला पूर्ण खात्री झाली आहे. ”

“ माफ करा ! तुमच्या या जिव्हाळ्याच्या विषयावर वादविवाद करायला मला वेळ नाही ! ” घड्याळाकडे पाहात साठे म्हणाले, “ पण शिकविण्याची तुमची पद्धत तुम्ही बदलली पाहिजे एवढंच मी सांगतों. नवीन—ज्याला तुम्ही तांत्रिक कसरती म्हणता—त्या कसरती करायला तुम्हांला शिकलं पाहिजे. ”

“ तें शक्य नाही ! ” ओठ आंवळीत आपल्या रागाला बांध घाल-ण्याचा प्रयत्न करीत आपटे मास्तर म्हणाले.

“ काय ? ” भिवया वर चढवीत साठ्यांनी विचारलें.

“ माझ्या स्पष्टवक्तेपणाबद्दल तुम्हांला राग येईल. ” आपटे आवाज शक्य तितका शांत ठेवीत बोलूं लागले, “ पण माझा नाइलाज आहे त्याला. आज पंचवीस वर्षं ज्या पद्धतीनं मी शिकवीत आलों आहे, ज्या पद्धती-बद्दल आतापर्यंत एकाहि विद्यार्थ्याला कुरकुर करण्याचं कारण पडलं नाही, ती माझी पद्धति वाईट; आणि केवळ अधिकाराच्या खुर्चीवर आहांत म्हणून तुम्ही सांगत आहांत ती पद्धत चांगली असा तुमचा तरी दुराग्रह काय म्हणून ? आम्ही आज पंचवीस वर्षांच्या अनुभवानं जे सिद्धान्त बसवतों, त्यांना तुमच्या दृष्टीने कांहीच किंमत नाही ? शाळेंत नोकरी करायची

म्हणजे शिक्षकानं आपलं स्वतंत्र व्यक्तिमत्व विसरायचं, स्वतंत्रपणानं विचार करायची सवय सोडायची आणि अधिकारी सांगतील तें शिकवायचं अशी तर तुमची कल्पना नाही ! विद्यार्थ्यांच्या बौद्धिक विकासाची तुम्ही काळजी घेतां; पण ते विद्यार्थी तयार करणाऱ्या शिक्षकाच्या बौद्धिक विकासाची वाढ तुम्ही खुंटवीत आहांत याची तुम्हाला कल्पना नसेल."

"मिस्टर आपटे..." साठे जरा रागानं म्हणाले, "काय बोलतां आहांत तुम्ही? कुणासमोर बोलतां आहात याची जाणीव आहेना तुम्हांला!"

"ती जाणीव पूर्णपणानं आहे मला." आपटे मास्तर शक्य तितक्या शांत आवाजांत बोलण्याचा प्रयत्न करीत होते. "आपण इन्स्पेक्टर आहांत व मनांत आणलं तर एखाद्या शिक्षकाचं जन्माचं वाटोळं करायला समर्थ आहांत. पण तेरा वर्षांपूर्वी आपण माझे विद्यार्थी होता. आणि गुरु या नात्यानं थोडंफार कांहीतरी आपणाला सांगायचा मला अधिकार आहे असं मला वाटतं! तो मानणं न मानणं सर्वस्वी तुमच्या हातांत आहे. शालेय विश्वांत तुमची सत्ता फार मोटी आहे. पण त्या सत्तेचा उपयोग शिक्षकांची स्थिति सुधारण्याकडे केलात तर कितीतरी जिवांचा तुम्हाला दुवा मिळेल. शिक्षकालाहि स्वतंत्र व्यक्तिमत्व असतं, स्वतत्र विचारशक्ति असते आणि विद्यार्थ्यांशीं त्याचा सारखा संबंध येत असल्यानं अध्यापनांतील निरनिराळ्या पद्धतींच्या मर्यादांची त्याला कल्पना असते. तेव्हा त्याच्यावर जरा विश्वास टाकायला शिका. केवळ अधिकार आहे म्हणून आपलीं मतं सक्तीनं दुसऱ्यावर लादून आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नका."

"अधिकाराचा दुरुपयोग? मिस्टर आपटे, तुम्ही माझा अपमान करीत आहांत!" साठे रागानं ओरडले.

"बिलकूल नाही. साधा उपदेश जर तुम्हाला अपमानासारखा वाटला तर त्याला माझा कांहीच इलाज नाही." आपटे शांत आवाजांत म्हणाले.

"नाही कसा?" साठे अधिकच चिडून म्हणाले, "आम्ही आमच्या अधिकाराचा दुरुपयोग करतों, असं म्हणून तुम्ही जाणूनबुजून माझा

अपमान केला आहे. तुम्हाला तुमचे शब्द परत घ्यावे लागतील आणि माझी क्षमा मागावी लागेल."

"मागं घेण्यासारखे शब्द मी उच्चारले नाहीत अन् त्याबद्दल क्षमा मागण्याचं कारणहि मला दिसत नाही. ठीक आहे. नमस्ते. घंटा झाली. मला वर्गावर जायला पाहिजे." असें म्हणून संतापाने लाल झालेल्या साळ्यांकडे नजरहि न टाकतां आपटे ऑफिसच्या बाहेर निघून गेले.

आपटे मास्तरांनी इन्स्पेक्टरचा अपमान केला ही बातमी हांहां म्हणतां साऱ्या शिक्षकवर्गांत पसरली. जो तो आपट्याकडे एका निराळ्या भावनेने पाहूं लागला. अन्यायाविरुद्ध बोलण्याची कुणाचीच छाती नव्हती. निदान आपणापैकीच कुणीतरी आपल्या मनांतले विचार इन्स्पेक्टरला ऐकवले याबद्दल त्यांना कौतुक वाटत होतें. पण दुर्दैवाने तें कौतुक त्यांना आपट्याचें अभिनंदन करून प्रकटहि करतां येत नव्हतें. याचा परिणाम कांहीतरी वाईट होणार अशी भीतीहि सर्वांना वाटत होती.

पांचवा तास चालू असतांनाच मुख्याध्यापकाने आपटे मास्तरांना वर्गावरून बोलावून घेतलें.

"मिस्टर आपटे, तुमचा विचार तरी काय आहे? शाळेवर कांही-तरी गंडांतर आणावयाचा विचार नाही ना? अहो, आज इन्स्पेक्टरच्या एका शेऱ्यानं शाळेचं केवढं नुकसान होईल याची कल्पना आहेना तुम्हाला? आणि तुम्ही खुशाल इन्स्पेक्टरला वाटेल तें बोलतां अन् त्यांचा अपमान करतां?"

"प्रामाणिक मतप्रदर्शन हा जर त्यांना अपमान वाटत असेल तर माझा नाइलाज आहे त्याला." आपटे मास्तर शांतपणें म्हणाले.

"चुलींत गेलं तुमचं प्रामाणिक मतप्रदर्शन!" मुख्याध्यापक रागाने ओरडले, "तुमचीं प्रामाणिक मतं ऐकवायला तुम्हांला इन्स्पेक्टरच सांपड-डले वाटतं? इन्स्पेक्टर किती चिडले आहेत माहित आहे तुम्हाला? मुका-ट्यानं तुम्ही आपले शब्द परत घ्या अन् त्यांची माफी मागा! विनाकारण आपल्या तऱ्हेवाईकपणाचं प्रदर्शन करूं नका अन् शाळेला नसत्या संकटांत लोटूं नका."

"पण मी अयोग्य असे कोणतेच शब्द बोललों नाही तर मी माफी कां मागावी?" आपटे मास्तरांनी विचारलें.

"अहो, तुम्ही नसाल बोलला अयोग्य शब्द! पण तो गृहस्थ अधिकाराच्या जागेवर आहे हें तरी माहित आहे ना तुम्हाला?" मुख्याध्यापक जरा रागाने बोलत होते, "इन्स्पेक्टरची मर्जी सांभाळतां सांभाळतां आमच्या कोण नाकीं नऊ येतात, त्याचीं किती तंत्रं सांभाळावीं लागतात. आणि तुम्हांला केवळ त्यांचीं मतं त्यांना विरोध न करतां ऐकवलीं नाहीत! तें कांही नाही. इन्स्पेक्टर इथं आल्यावर तुम्ही त्यांची माफी मागितली पाहिजे."

"आणि मी माफी नाही मागितली तर...?" आपटे मास्तरांनी विचारले.

"कशाला उगीच हट्टाला पेटतां मिस्टर आपटे?" मुख्याध्यापक म्हणाले. "त्यांच्या हातांत किती सत्ता असते माहित आहे ना तुम्हाला? तुम्हीं माफी मागितली नाही तर त्याचा परिणाम चांगला व्हायचा नाही."

"मला शाळेची नोकरी सोडावी लागेल, येवढंच ना?" आपटे मास्तरांनी शांतपणें विचारलें. मुख्याध्यापक आश्चर्याने आपट्यांकडे पाहूं लागले.

"म्हणजे? हें कांहीच नाही का?" मुख्याध्यापकाने आश्चर्याने विचारलें, "अन् याहीपेक्षा पुढं माहीत आहेत का तुम्हाला काय होईल तें? इन्स्पेक्टरचा अपमान केल्याची वार्ता इतर शाळांतून पसरल्यावर इतर शाळांतून नोकरी मिळणंसुद्धा तुम्हांला अशक्य होईल. रागाच्या भरात कांहीतरी अविचार करू नका."

"मी तुम्हांला एक प्रश्न विचारतों." आपटे मुख्याध्यापकाकडे पाहात म्हणाले. "तुम्ही तरी इन्स्पेक्टरची अशी अन्याय्य मागणी कां मान्य करतां हो? इन्स्पेक्टरच्या मताला विरोध करणं म्हणजे त्याचा अपमान करणं नव्हे, अशी भूमिका तुम्ही कां घेत नाही? तुम्ही शाळेचे मुख्याध्यापक आहांत. शाळेंतलि शिक्षकांच्या हितसंबंधाला जपणं हें तुमचं पहिलं कर्तव्य आहे. आज इन्स्पेक्टरनं माझ्या माफीची मागणी केली, उद्या ते व्यक्तिगत

द्वेषावरून दुसऱ्या एखाद्या शिक्षकाला काढून टाकायला सांगूं लागले तर तुम्ही त्यांच्यापुढं मान तुकविणार? तुम्ही एका जबाबदार संस्थेचे मुख्य आहांत व त्या दृष्टीनं तुमची जबाबदारी तुम्हीं ओळखायला नको का?"

"माझी जबाबदारी मला पूर्णपणानं कळते आहे!" मुख्याध्यापक आपट्यांच्या या भाषणाने गरम होऊन म्हणाले, "त्याचे धडे तुम्हीं मला द्यायला नकोत. मुख्याध्यापक या नात्यानं मीं तुम्हांला पुन्हा सांगतों— तुम्हीं इन्स्पेक्टरचा अपमान केला आहे. तुम्हीं त्यांची माफी मागितली पाहिजे."

"आणि त्या प्रश्नाला मीं अगोदरच उत्तर दिलं आहे. त्यापेक्षा आणखी स्पष्ट उत्तर पाहिजे असेल तर..." आपटे मास्तरांनी खिशांतून एक कागद काढला व तो मुख्याध्यापकांपुढे ठेवला, "हा घ्या माझा राजीनामा. गोष्टी या थराला येणार म्हणून वर्गांत मीं तो तयार ठेवलाच होता."

"राजीनामा?" मुख्याध्यापक आश्चर्यानं म्हणाले, "वेड तर नाही लागलं तुम्हांला? कसला अविचार करतां आहांत तुम्ही हा!"

"अविचार?" आपटे मास्तर तिरस्काराने हसून म्हणाले, "सुविचार आहे हा! अविचार आज पंधरा वर्षे करीत होतों. निरनिराळे अन्याय सोसून व निरनिराळ्या अपमानांना तोंड देऊन एखाद्या लाचारासारखा शाळेंत राहिलों हाच अविचार झाला माझ्या हातून! वीस सालीं शाळेंत आलों तो केवढ्या उत्साहाने! पंधरा वर्षांत शाळा म्हणजे संस्कृत अभ्यासाचं केंद्र बनवून दाखवीन अशी महत्त्वाकांक्षा होती माझी! पहिलीं दहा वर्षं रक्ताचं पाणी करून त्या महत्त्वाकांक्षेला बरंच मूर्त स्वरूप देत आणलं होतं मी. आणि त्यानंतर संस्थेच्या मुख्यांनी माझे पाय मागं ओढायला सुरवात केली. त्याच वेळीं वास्तविक संस्था सोडून जायला पाहिजे होतं मी! पण संस्थेवरच्या प्रेमानं मला तसं करूं दिलं नाही. आणि प्रेमाचा मोबदला या पंधरा वर्षांत कोणता मिळाला मला? निंदा, अपमान, उत्साहभंग!"

"पुरे! तुमचा राजीनामा मी जरा बाजूला ठेवतों. शिक्षकांच्या खोलींत जा, जरा विचार करा आणि मग मला येऊन निर्णय कळवा."

" माझा निर्णय कधीच बदलणार नाही. " आपटे जोरांत म्हणाले, " ज्या संस्थेला आपल्या शिक्षकाच्या मानापमानाची पर्वा नाही, त्या संस्थेंत राहण्याची मला बिलकुल इच्छा नाही. "

" तुम्ही आता एक शब्दसुद्धा न बोलतां इथून जा. " मुख्याध्यापक जरा मोठ्याने म्हणाले, " संतापानं तुमचं डोकं बरंच फिरलंय्! तुमच्या-बरोबर माझं मस्तक विनाकारण फिरवूं नका. हं, जा ! "

कुणींतरी अज्ञात शक्तीने ढकलल्यासारखे आपटे मास्तर ऑफिसां-तून बाहेर पडले. त्यांचें डोके खूपच तापलें होतें. विचारांचें तर तुफानच माजलें होतें डोक्यांत ! शिक्षकांच्या खोलींत ते आले. सुदैवाने सर्व शिक्षक तासावर गेल्याने खोलींत कोणीच नव्हतें. आपटे मास्तरांना असाच एकांत पाहिजे होता. कोपऱ्यांत असलेल्या आपल्या ठराविक जागेकडे ते गेले, मागें तक्क्यावर मान टेकली अन् डोळे मिटून घेतले.

मुख्याध्यापकांसमोर अखेरचा निर्णय त्यांनी दिला असला तरी त्यांच्या डोक्यांत परस्परविरोधी विचारांचें वादळ अद्याप सुरूच होतें. ' माफी की राजीनामा ? माफी मागून लाचारी पतकरायची ? आपण आत्तापर्यंत दिलेल्या स्वाभिमानाच्या आहुतींत ही अखेरची आहुति देऊन नामुष्कीचं जिणं जगायचं ? की राजीनामा देऊन तडफेनं बाहेर पडायचं ? पण राजी-नामा दिल्यावर पुढं काय ? काय करणार आपण ? आपल्या दोन मुलांचं अद्याप शिक्षण व्हायचं आहे, मुलीचं लग्न व्हायचं आहे, त्याला पैसा कुठून आणणार आपण ? पैसा... आणि अधिकार... या दोन गोष्टींनी जगांत आजवर काय केलं नाही ? पैशाच्या जोरावर संस्थेला शिक्षकाचा स्वाभि-मान विकत घेतां येतो, अधिकाराच्या जोरावर शिष्य गुरूला लाचारीनं माफी मागायला लावूं शकतो. छे ! विचार करून डोकं फुटून जायची वेळ आली.

" कर्र्र्र टण... " घड्याळाच्या आवाजाने एकदम त्यांची विचार-मालिका तुटली. तास संपण्याची वेळ झाली म्हणून त्यांनी डोळे उघडले...

आश्चर्याने त्यांनी सगळीकडे नजर टाकली. आपण क्षणापूर्वी शिक्षकांच्या खोलींत होतों हें त्यांना आठवत होतें. माफी कीं राजीनामा हा पेचप्रसंग अद्याप सुटला नव्हता आपला. मग एकदम कुठे आलों आपण ?

आणि त्यांना मोठ्याने हसूं आलें. ती समोर अर्धवट उघडी पडलेली वही, ते बाजूला वह्यांचे गठ्ठे अन् समोर ते टक् टक् टक् करून अस्तित्वाची जाणीव देणारें त्यांचें नेहमीचें घड्याळ...म्हणजे? आपण खोली सोडून बाहेर कुठे गेलोंच नाहीं तर! अन् मग ती इन्स्पेक्शन, तें माफीप्रकरण, तो पेचप्रसंग...सारें स्वप्नच की काय?

आपटे मास्तरांचें मन स्वप्नांतील प्रसंगांतच गुंग होऊन गेलें होतें! अन् राहून राहून एकच प्रश्न सारखा त्यांच्या डोक्यांत येत होता, "स्वप्नांत आपण राजीनामा दिला असता की माफी मागितली असती?"

पण त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर त्यांचें त्यांनाच देता येईना. पण मधूनमधून सारखें त्यांना वाटे, 'बोलूनचालून परिस्थितीचे गुलाम आपण! स्वाभिमान, मतस्वातंत्र्य, विचारशक्ति यांची आहुतीच देत आलों आपण आजपर्यंत! मग स्वप्नांत तरी निराळं काय केलं असतं? आजपर्यंतच्या आहुतींत माफी मागून अखेरची आहुति देण्यापलीकडे पैसा अन् अधिकार या दुहेरी कात्रींत सापडलेला आपणासारखा दुबळा शिक्षक दुसरं काय करणार?'

"अखेरची आहुति...अखेरची आहुति खरीच!" असें पुटपुटत त्यांनी समोरील वही दूर सारली व अश्रूंनी डबडबलेल्या डोळ्यांनी समोरच्या घड्याळाकडे नजर टाकली.

● ○ ●

## महागाई भत्ता : : ४

'शारदा हायस्कूल'—त्या भव्य इमारतीवर मध्यभागीं शाळेच्या नांवाची पाटी मोठ्या डौलाने विराजत होती.

आणि खरोखरच त्या पाटीला डौलाने विराजण्यास तसेच सबळ कारण पण होतें.

रत्नपुरांतील अतिशय मोठी व अतिशय चांगली म्हणून ती शाळा नांवाजली गेली होती. शाळेचा मॅट्रिकचा निकाल तर चांगला असेच पण विद्यार्थ्यांच्या मानसिक व शारीरिक विकासाला पूर्ण वाव देण्याच्या दृष्टीने कितीतरी उपयुक्त योजना हातीं घेतल्या जात असत—नवीन नवीन प्रयोग तेथे नित्य चालू असत—विद्यार्थ्यांचें अनुभवक्षेत्र विस्तृत करण्यासाठी निरनिराळे भरीव कार्यक्रम विद्यार्थ्यांकरितां आंखले जात असत...थोडक्यांत शारदा हायस्कूल एक आदर्श विद्यालय होतें व रत्नपूरच्या लोकांचें तें एक अभिमानाचें स्थान होतें.

अशा प्रकारच्या हायस्कूलच्या संस्थापनेच्या मुळाशीं कुणीतरी शिक्षणतज्ज्ञ व हौशी लोक असतील अशी कल्पना कुणींहि केली असती.

पण वस्तुस्थिति तशी नव्हती.

गांवांतील मोठमोठे श्रीमंत व्यापारी ही शाळा स्थापण्याच्या मुळाशी होतें—ही मोठी आश्चर्यकारक घटना तर खरीच—पण ती खरी होती.

आज त्या शाळेच्या बोर्डावर व मॅनेजिंग कमिटीवर सर्व व्यापारी वर्ग होता.

अर्थात् शिक्षणक्षेत्रांतील नानाविध कल्पनाची व त्यांची तोंडओळखहि नव्हती हें सांगायला का हवे? एकच शहाणपणा त्या सर्वांनी दाखविला होता. शाळेच्या मुख्याध्यापकाच्या स्थानीं त्यांनी आंग्लशिक्षणविषयक पदवीने विभूषित असलेल्या व शिक्षणक्षेत्रांत नांवाजले गेलेल्या अशा डॉ. अनील देशपांडे यांची निवड केली होती.

आणि त्यांनीच शाळेला आज लौकिक प्राप्त करून दिलेला होता. त्यांच्या पूर्वीच्या हेडमास्तरांच्या कारकीर्दींतील संथ पद्धति यांच्या अंमलात बदलली जात होती— जास्त जास्त विद्यार्थी शाळेकडे आकर्षिले जात होते—आणि बोर्डातील व कमिटींतील मेंबरांना व शेअरहोल्डर्सना अतिशय फायद्यात शाळा पडूं लागली होती. अर्थात् सर्व बोर्ड व शेअर होल्डर्स अनील देशपांडे यांच्या कारकीर्दीवर खूष होते यांत आश्चर्य नाही.

नवीन नवीन योजनांमुळे लोकांचेहि डोळे दिपून जात होते व डॉ. अनील देशपांडे यांच्याबद्दल सर्वांना एक प्रकारचा विलक्षण आदर वाटायला लागला होता.

विजय देशपांडे याने शिक्षक म्हणून ज्यावेळी प्रथम या शाळेंत प्रवेश केला त्यावेळी त्याचेहि डोळे डॉ. देशपांडे यांच्या भव्य कारकीर्दीमुळे असेच दिपून गेले होते.

पण त्यांच्या या कल्पनांचा भोपळा फार लवकर फुटला. अनील देशपांडे यांचें सारं यश शिक्षकांच्या त्यागी व अति गरीब वृत्तीवर आहे हें त्याला लवकरच कळून आलं! 'शिक्षक हा शाळेचा चोवीस तास नोकर असतो' हें त्यांचें अतिशय आवडतें तत्त्व होतें आणि त्यामुळे शाळेंतील ठराविक अध्यापनाव्यतिरिक्त, निरनिराळ्या कलांत प्राविण्य मिळविण्याचे वर्ग–वक्तृत्व संस्था–क्रीडा विभाग–सहल विभाग–लेखन विभाग— नापास विद्यार्थ्यांसाठी सुधारणा वर्ग— एक ना दोन, अशा किती तरी चळवळींत त्यांनी आपल्या शाळेंतील शिक्षकांना गोंवून टाकले होते. त्यामुळे सकाळी आठपासून कित्येक वेळां शिक्षकाचें काम सुरू होई तें रात्रीं आठपर्यंत सुद्धा संपत नसे आणि अशा या अधिक कामाबद्दल

मोबदला द्यायची प्रथा नव्हती. कुणी एखाद्याने त्याविषयी अधिक तक्रार केलीच तर ' स्वार्थत्याग हीच खरी सेवा ' या शाळेच्या ध्येयवाक्याकडे बोट दाखविण्यांत येई— त्यावेळी अर्थात् दुसरें बोट बाहेरच्या दरवाजाकडे असेच. बिचारे शिक्षक ! तक्रार करावी तर तें शक्य नव्हतें— कारण बोर्ड सारे देशपांड्यांच्या मुटींत ! आणि सोडून जावें म्हटलें तर पुष्कळांची १०–१०, १५–१५ वर्षें नोकरी झालेली व शिवाय करारानें बांधले गेलेले. तोंड दाबून बुक्याचा मार सहन करण्यापलीकडे स्वतंत्र वृत्ति दाखविण्याची तडफ कुणाच्याच अंगांत नव्हती.

हें सर्व विजय देशपांड्यांनी पहिल्या दोन महिन्यांतच ओळखलें आणि देशपांड्यांच्या या वृत्तीबद्दल त्यांना अत्यंत चीड पण आली. वास्तविक शाळा अत्यंत फायद्यांत चालली होती. मुलांचें फीचें— व अवान्तर उत्पन्न शाळेला खूप होते— शाळेला देणग्याहि मोटमोठ्या मिळत. पण शिक्षकांच्या या जादा श्रमांचें चीज करण्याचें-त्यांना त्यांच्या अधिक कामाबद्दल मूल्य देण्याचा विचार डॉ. देशपांड्यांच्या मनांत कधींच डोकावला नाही. त्यांनी बजेटमध्ये हा खर्च मांडून बोर्डापुढें टेवला असतां तर बोर्डानेसुद्धा त्यांच्याविरुद्ध काहूर उठवले असते अशांतलाहि प्रकार नाही. पण कांही कांही लोकांची वृत्तीच अति चिकट असते. हातांत असून लोकांचें कल्याण करायचें नाही व अधिकाराच्या जोरावर त्यांच्या न्याय्य मागण्या लाथेखाली तुडवायच्या अशा संकुचित वृत्तीच्या अधिकाऱ्यांपैकी डॉ. देशपांडे होते. आणि त्यामुळे शिक्षकांनी वरून प्रत्यक्ष जरी विरोध दाखवला नाही तरी प्रत्येक जण मनांतून असंतुष्ट होता.

परंतु विजय देशपांड्यांनी या त्यांच्या वृत्तीला जोराचा विरोध करायचा ठरवलें व पहिल्या महिन्याच्या शेवटींच देशपांडे व डॉ. देशपांडे यांचा पहिला खटका उडाला,

त्या दिवशीं शाळा सुटल्यावर विजय देशपांड्याला बोलावयास डॉ. देशपांडे यांनी गडी धाडला. देशपांडे आंत आला. आपणाला ' बसा ' म्हणण्याइतका शिष्टाचार डॉ. देशपांडे दाखवितील यासाठी दोन तीन मिनिटें त्यांनी वाट पाहिली. पण आपणसमोर कामाकरितां आलेल्या शिक्षकाला

बसा म्हणण्याचा शिष्टाचार डॉ. देशपांडे यांनी कधीच दाखविला नव्हता. उलट आपल्यासमोर आले असतां शिक्षकांनी उभेंच राहिलें पाहिजे हा अलिखित नियमच त्यांनी घालून दिला होता विजय देशपांड्यांनी हा नियम प्रथम मोडला. त्याने शेजारची खुर्ची ओढून घेतली व त्यावर आसन ठोकलें. डॉ. देशपांडे यांच्या कपाळावर जरा आठ्यांचें जाळें पसरलें पण देशपांड्यांनी तिकडे दुर्लक्षच केलें.

"तुम्हाला बोलावण्याचें कारण असें--" डॉ. देशपांड्यांनी सांगायला सुरवात केली,—"उद्यांपासून आम्ही सायन्स व गणित यामध्ये कच्च्या असलेल्या मुलांसाठी कोचिंग क्लास काढणार आहोंत. कोचिंग क्लास सकाळी ८ ते ९ भरेल. तेव्हा तुम्हांला तो घ्यावा लागेल. मुलांची या दोनहि विषयांत योग्य प्रगति होते आहे हें पहाण्याची जबाबदारी तुमच्यावर राहील. त्याचप्रमाणे संध्याकाळी शाळेच्या क्रीडांगणांवर खो खो, आट्यापाट्या व हुतुतू हे तीन खेळ सुरू करण्याची व्यवस्था आम्ही करीत आहोंत. त्यावर देखरेख करण्याचें काम आम्ही तुमच्यावर सोपविणार आहोंत. तेव्हा संध्याकाळी ५॥ ते ७॥ हा वेळ तुम्हाला तिथे घालवावा लागेल."

"या माझ्या अधिक कामाबद्दल आपण मला मोबदला काय देणार आहांत?" देशपांड्यांनी तितक्याच व्यवहारी सुरांत विचारलें.

"मोबदला?" डॉ. देशपांडे आश्चर्याने म्हणाले, "शाळेंतील कोणत्याहि अधिक कामाबद्दल मोबदला देण्याची प्रथा नाही."

"मग माफ करा!" देशपांड्यांनी शांत आवाजांत उत्तर दिलें, "मला हीं कामं अंगावर घेतां येणार नाहीत."

"तुम्ही काय उत्तर देतां याची कल्पना आहे का तुम्हांला? आजपर्यंत शाळेंतील शिक्षक हीं कामं विनामूल्य करीत आले आहेत. शाळेंतल्या कामाचाच हा एक भाग आहे शिक्षकांच्या नेहमीच्या कामापैकीच हें एक काम आहे असें मी समजतों."

"मला तसं बिलकूल वाटत नाही." देशपांड्यांनी उत्तर दिलें. "साडेअकरा ते साडेपांच फक्त आम्ही शाळेचे नोकर आहोंत. त्यावेळीं

वाटेल तें व वाटेल तितकें काम करण्याची आमची तयारी आहे. पण त्या व्यतिरिक्तच्या कोणत्याहि वेळांत शाळेने शिक्षकाला काम सांगितलें तर त्या त्याच्या वेळेबद्दल शाळेने योग्य तो मोबदला अवश्य दिला पाहिजे. इतर मोठमोठ्या शाळेंत ही प्रथा आहे. "

" मला इतर मोठ्या शाळांच्या प्रथा नको आहेत. " डॉ. देशपांडे रागाने ओरडले. " या शाळेंत शिक्षक हा चोवीस तास शाळेचा नोकर असतो हें तुमच्या अद्याप लक्षांत आलेलें दिसत नाही. तुम्हांला हीं कामं केलींच पाहिजेत असें मुख्याध्यापक या नात्याने मी तुम्हाला सांगतों. "

" मला फार वाईट वाटतं—" देशपांडे शांत स्वरांत म्हणाला, " पण ही कामं मी करूं शकणार नाहीं. "

" देशपांडे—याचा अर्थ कळतो ना तुम्हांला ? " डॉ. देशपाडे रागाने उठून म्हणाले, " This is insubordination. हा माझा उपमर्द आहे. "

" आपणाला तसं वाटत असल्यास माझा नाइलाज आहे. " देशपांडे उठत म्हणाला, " पण माझं न्याय्य मागणं आपणापुढे ठेवण्यांत मला अधिकाऱ्याचा कोणत्याहि रीतीनं उपमर्द केल्यासारखं वाटत नाही. "

—आणि इतकं बोलून विजय देशपांडे खोलीच्या बाहेर पडला.

लवकरच विजय देशपांड्याचा डॉ. देशपांडे यांचेशी झालेला हा झगडा सर्वतोमुखीं झाला व कांही काळ विजय देशपांडे साऱ्या शिक्षकांचे कौतुकाचें केंद्र होऊन बसला पण विजयला केवळ हेंच नको होतें. साऱ्या शिक्षकांवरील हें अन्यायाचें जोखड दूर झालें पाहिजे अशी त्याची प्रामाणिक इच्छा होती. आणि त्या दृष्टीने वाटेल ती खटपट करण्याची त्याची तयारी होती. पण—

पण शिक्षकच त्याच्या मार्गांतील खरी अडचण होती. त्यानं प्रत्येकाला भेटून कळकळीने सांगितलें, " तुम्ही या तुमच्या अन्याय्य कामाबद्दल बंड उभारा—त्याचा प्रतिकार करा—प्रसंग पडल्यास इन्स्पेक्टरकडे अर्ज करा. कोचिंग क्लासेसच्या विद्यार्थ्यांकडून पैसे घेण्यांत येतात—खेळ—कला इ. प्रत्येक विभागाकरिता विद्यार्थ्याला फीबरोबर पैसे द्यावे लागतात—आणि तुम्हांला त्यांतला कांहीच हिस्सा मिळूं नये हा अन्याय तुम्हांला पहावतो

तरी कसा ? निदान वर्तमानपत्रांतून या गोष्टी प्रसिद्धीला आणा—मी तुमच्याकरिता वाटेल तें करतों—वाटेल त्या संपादकाला भेटतों—"

पण सगळ्यांनी त्याच्या बाणेदारवृत्तीचें कौतुक केलें होतें आणि सांगितलें होतें, " विजय—तुम्ही तरुण आहांत—तुमचं उसळतं रक्त आहे. आमच्यांत इतकी तडफ राहिली नाही आणि हो नोकरी सोडून दुसऱ्या नवीन ठिकाणी जाणं आम्हांला आता जमणार नाही. येईल तो दिवस पुढे ढकलायचा हेंच आमच्या आयुष्यांतील ध्येय. "

आणि हीं त्यांचीं उत्तरं ऐकून विजयला चीड येई. ही शेळपट वृत्ति टाकून यांनी जरा उग्र स्वरूप दाखवलें तरी डॉ. देशपांडे यांचें कांही चालणार नाही हें तो समजून होता. पण शिक्षकांना हें पटत नव्हतें. आपण आहोंत म्हणून शाळा आहे याऐवजी शाळा आहे म्हणून आपण आहोंत अशी प्रत्येकाची वृत्ति होती. चाळीस शिक्षकांनी सामुदायिक विरोध केला तर त्या विरोधाला केवढें सामर्थ्य येईल याची त्यांना कल्पना नव्हती—किंबहुना विरोध—आणि अधिकाऱ्यांशी विरोध—ही गोष्टच त्यांना धोक्याची वाटते.

तेव्हा अशा वृत्तीच्या शिक्षकांची स्थिति सुधारण्यासंबंधीं विजयला जरी तळमळ लागून राहिली होती तरी आपण तें करण्यास असमर्थ आहोंत याची जाणीव त्याला होती आणि म्हणूनच तो जास्त चिडला होता.

*　　*　　*

पण नंतरच्याच वर्षी युद्धजन्य महागाईने भिषण स्वरूप धारण केलें. रत्नपुरांत तर महागाईचें स्वरूप अतिशयच उग्र झालें. जीवनाला आवश्यक अशा पुष्कळ गोष्टी मिळेनाशा झाल्या—ज्या मिळत होत्या त्यांना तिप्पट किंमत पडूं लागली. 'काळा बाजार' नांवाचा नवीन राक्षस निर्माण झाला. जिकडे तिकडे टंचाई व महर्गता मोठ्या प्रमाणांत भासूं लागली.

शारदा हायस्कूलमधील शिक्षकांवर तर या परिस्थितीचा परिणाम विलक्षण झाला. त्यांचा पगार समाधानकारक असला तरी इतर शाळेंतील शिक्षकांप्रमाणे शिकवण्या वगैरे करण्यास त्यांना पुरेसा वेळ नसल्याने त्यांची शिल्लक विशेष नव्हती—आणि त्यांत ही विलक्षण लाट वेगाने आल्याने

कांही काळ सर्वजण स्तंभितच झाले. पहिले चार पांच महिने प्राप्त परिस्थितीस मोठ्या नेटाने तोंड देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. जीवनांत आवश्यक अशा चैनीच्या व हौसेच्या गोष्टींना पूर्णविराम देऊन व कांही कांही बाबतींत आवश्यक गोष्टीलाहि काटकसरीची कात्री लावून त्यांनी आपल्या वेतनामध्ये आपला खर्च बसविण्याचा अतोनात प्रयत्न केला. पण जिथे आभाळ फाटलें तिथे ठिगळें कुठे कुठे व कशी लावणार ? बाजार रोखीचा झालेला —चुलींत घालण्याच्या सरपणापासून चुलीवर ठेवाव्या लागणाऱ्या अन्नापर्यंत प्रत्येक गोष्ट तिपटी चौपटीने महाग झालेली—म्हणजे पूर्वीच्या साठ रुपयांची बाजार दृष्ट्या किंमत केवळ वीस रुपये झालेली– अशा स्थितींत शाळेचें वेतन त्यांना किती व कसें पुरणार ? परिस्थिति आज निवळेल, उद्या निवळेल या कल्पनेने शिक्षकांनी आपल्याजवळ असलेल्या बँक-बुकाला बाहेरची हवा दाखविण्यास सुरवात केली. पण जास्तींत जास्त ७० ते ९० रुपये मिळविणाऱ्या शिक्षकाचें बँक बुक तें ! अशा भीषण महर्गतेंत दोन चार महिन्यांतच साऱ्या शिलकेची चटणी उडायला कितीसा अवकाश लागणार ? हळूहळू जवळ शिल्लक नाही—वेतन आवश्यक गोष्टीच्या खरेदीलाहि पुरेसें पडत नाही—कर्ज काढण्यावाचून गत्यंतर नाही आणि कर्ज मिळण्याची शक्यता नाही. असा विलक्षण पेंचप्रसंग प्रत्येक शिक्षकापुढे येऊन उभा राहिला.

अशा स्थितींत एकच मार्ग त्यांना दिसत होता. आणि तो म्हणजे शाळेकडे मदतीची याचना करणें. जवळ जवळ सगळ्या लहानमोठ्या शाळेला महागाई–भत्ता मंजूर केल्याच्या बातम्या त्यांच्या कानावर येत होत्या—आणि आपलीहि शाळा त्या दृष्टीने उदार धोरण दाखवील या आशेने साऱ्या शिक्षकांनी महागाई भत्ता मिळण्याबाबत बोर्डाकडे अर्ज केला होता. पण तो बोर्डाने पार फेटाळून लावला. इतकेंच नव्हे तर अर्ज घेऊन गेलेल्या शिष्टमंडळाचा अपमान करण्यास बोर्डाने मागेपुढे पाहिलें नाही. बोर्डाचें म्हणणें एकच—'अगोदरच तुम्हाला पगाराची स्केल्स आम्ही सढळ हाताने मंजूर केलीं आहेत—इतर शाळांतील शिक्षकांपेक्षा

पांच पांच दहा दहा रुपये तुम्हांला अधिक मिळतात–त्यामुळे बजेट अगोदरच फुगलें आहे. त्यांत आता महागाई भत्त्याची व्यवस्था करणें शक्य नाही.' इतकेंच नव्हे तर बोर्डामधील मराठी चार इयत्ता शिकलेल्या एका व्यापाऱ्याने शिक्षकाविषयीं अत्यंत बेजबाबदारपणाचे उद्गार काढून शिष्टमंडळाचा अपमानहि करण्यास मागेपुढे पाहिलें नव्हतें.

ही सारी परिस्थिति पाहून विजयच्या अन्तःकरणांत बोर्डाविषयीं विलक्षण चीड निर्माण झाली होती. सभोवताली आपल्या व्यवसाय बंधूंना जीवन मानाने जगणेंसुद्धा कितीं अशक्य आहे तें त्याला दिसत होतें. ज्याच्या घरांत चार मुलंबाळं आहेत अशा शिक्षकांना आपल्या मुलाना एक वेळ दूध देणें सुद्धा अशक्य होऊन बसलें होतें—बाजारांत आलेल्या वाईट शिधसामुग्रीने कित्येकांच्या घरांत आजाराने ठाणें दिलें होतें व त्यांचीं डॉक्टरचीं बिलें भरणेंसुद्धा त्यांना शक्य होत नव्हतें! स्वतः विजय शिक्षकांचा स्वाभिमान न दुखावेल अशा बेताने त्यांना या ना त्या प्रकाराने किती तरी मदत करीत होता. पण तो कांही झालें तरी महिना साठ रुपये मिळवणारा शिक्षक होता. तेव्हा त्याची धाव कुंपणाच्या पलीकडे कितीशी जाणार? कित्येक शिक्षकांनी स्वतःच्या घरचें सोनेनाणें विकायला काढलेलें त्याला माहीत होतें–– आणि एका शिक्षकाने तर आपल्या प्राणापेक्षा प्रिय असलेलीं पुस्तकें जुन्यापुस्तकाच्या दुकानांत विकलीं होतीं–आणि हें दिसत असून 'या शिक्षकांना चैन करण्याकरिता पैसा पाहिजे' असें त्यांचें म्हणणें सहानुभूतीपूर्वक ऐकून न घेतां, एका मेंबराने विधान करावें याची त्याला विलक्षण चीड आल्यास नवल नाही.

आणि त्यामुळे '–आमच्या महागाईबाबतच्या अर्जाचा पुन्हा कनवाळूपणाने विचार करण्यांत यावा' असा पुन्हा बोर्डाकडे अर्ज करण्यासाठी ज्या वेळी शिक्षकांची सर्वसाधारण सभा भरली त्यावेळी मोठ्या तावातावाने चिडून तो उभा राहिला.

"मी अगदी चिडून बोलणार आहे—" तो जोरांत बोलूं लागला, "आणि अगदीं स्पष्ट बोलणार आहे. माझें बोलणें तुम्हाला कडू लागेल तर क्षमा करा. पण माझा सभेला असा सवाल आहे की आता आणखी

किती शेळपट वृत्ति धारण करणार आहांत? बोर्डाने तुमच्या शिष्टमंडळाच्या केलेल्या अपमानाचे पडसाद अद्याप विरत नाहात तोंच तुम्हां पुन्हा दयेची याचना करायला त्यांच्याकडे धाव घेतां–इतका तुमचा स्वाभिमान जळून गेला आहे? शिक्षक म्हणजे शाळेचे गुलाम अशी हीन समजूत तुम्हीं स्वतःची कां करून घेतली आहे?—आणि तुम्ही जितके लाचारीने वागाल तितके बोर्डातील लोक तुम्हाला कचऱ्याप्रमाणे लेखतील. त्यांच्याकडे अर्ज करून कांही उपयोग होणार नाही. केवळ त्यांच्या केराच्या टोपलीची भर करण्यासाठी तुम्हाला हा अर्ज लाचारीने पुन्हा धाडावयाचा असेल तर खुशाल धाडा—"

'पण मग काय करावें असें तुमचें म्हणणें आहे?" एका शिक्षकाने मध्येच त्याला प्रश्न केला.

" संप—आपण चाळीस जणांनी मिळून एकदम संप पुकारला म्हणजे आपोआप श्री. देशपांड्यांचे व बोर्डाचे डोळे उघडतील." विजयने उत्तर दिलें.

'संप' या शब्दाच्या उच्चाराबरोबर सर्व शिक्षक आश्चर्याने ताठ बसले व विस्फारीत नजरेने विजयकडे पाहूं लागले.

"काय संप?" त्यापैकी कांहीच्या तोंडून उद्गार बाहेर पडला.

"हो हो–संप!" विजयने जोरांत म्हटलें, "यांत तुम्हाला आश्चर्य काय वाटलें? नुसते अर्ज करून व दयेची याचना करून हा बोर्डातील व्यापारीवर्ग वळणार आहे असें कां तुम्हाला वाटतें? पण उद्या तुम्ही संघटित सामर्थ्य दाखवलेंत—चाळीस लोकांनी महागाईभत्ता मिळाल्याखेरीज काम करण्याचें नाकारलें तर खात्रीने नाक मुठींत धरून बोर्ड तुम्हाला शरण येईल. आज चाळीस शिक्षकांना शाळेंतून एकदम काढून टाकणें त्याना शक्य नाही—तुमच्या इतके उत्कृष्ट शिक्षक कुठे मिळणार नाहीत ह्याची जाणीव बोर्डाला नसली तरी देशपांडयांना खास आहे. तेव्हा हे अर्ज आणि या विनंत्या आता पुरे. मागे कर्जासंबंधींची विनंति फेटाळून लावण्यांत आली—आता महागाईभत्त्यासंबंधींच्या अर्जाला केराची टोपली दाखविण्यांत आली. म्हणजे शिक्षकांना शाळेचे घटक या दृष्टीने कांहीच

किंमत नाही असा उघड उघड याचा अर्थ दिसतो. तेव्हा तुम्ही आपली योग्यता त्यांना पटवून देण्याची वेळ आली आहे—"

"तें खरे हो—" एक शिक्षक जरा आश्चर्याने म्हणाले, "पण संप?"

"मजुरासारखा संप करायचा आपण?" दुसऱ्या एकाने नाक मुरडलें.

"अहो, पण संप हें जरी मजुरांचें हत्यार असले तरी त्याचा उपयोग शिक्षकाने करूं नये असं थोडंच आहे?" विजयने संतापाने उत्तर दिलें. "एकाद्या गुलामाप्रमाणे शिक्षक म्हणजे हेडमास्तरांच्या हातांतील बाहुलें अशी समजूत कां करून घेतां आहात तुम्ही स्वतःची? मी सांगतों—तुम्ही थोडी संघशक्ति दाखवा—जरा वरच्या सत्तेला विरोध करा म्हणजे ताबडतोब तुमच्या न्याय्य मागण्याची दाद घेतली जाईल. तुमच्या मागण्या कांही अवास्तव स्वरुपाच्या नाहीत—किंवा त्या मान्य करणें शाळेच्या आर्थिक परिस्थितीला परवडणार नाही असेंहि नाही. पण तुम्ही जर अन्यायाचा प्रतिकार न करतां एकाद्या गरीब गाईप्रमाणे सर्वच अन्याय सहन करीत बसाल तर या गांवांतल्या मूठभर व्यापाऱ्यांनी तुम्हाला लाथेखाली तुडवावें यांत काय नवल? तुम्ही जरा जागे व्हा—"

"आणि आपणा सर्वांना नोकरीवरून काढलें तर?" एकाने शंका काढली, "तुमचें ठीक आहे हो! तुम्ही एकटे आहांत—"

"हें पहा" विजय म्हणाला, "तुमची शंका व्यर्थ आहे. आज चाळीस उत्कृष्ट शिक्षक काढून शाळा बंद ठेवणें त्यांना शक्य आहे का? दुसरे शिक्षक तरी त्यांना आता या पगारांत मिळणार आहेत का! सारा पदवीधरांचा व मॅट्रिक पास झालेल्यांचा ओघ पुणें, मुंबई येथे मिलिटरी अकाऊंट्स, देहू रोड, खडकी इकडे चालला आहे. त्यांना तिकडे महिना १५०-२०० रुपये पगार मिळत आहे. तो सोडून या भिकार ३० रुपयांच्या नोकरीमागे कोण धडपडेल? आणि प्रसंग आला तर आपणाला त्या खात्यांत यापेक्षाहि जास्त पैसा मिळेल. मग सांगा आता—किती माझ्या या योजनेला अनुकूल आहेत?"

एकदम प्रश्न आल्याने सारे शिक्षक गोंधळून गेले. मनाची अनिश्चितता प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दिसत होती. ‘ बंड उभारायचं ’ ही कल्पनाच त्यांच्या डोक्यांत उतरेना. शिक्षकानी मुलांना शिकवायचं, हेडमास्तरांचीं व इन्स्पेक्टर्सचीं बोलणीं खाली मान घालून ऐकून घ्यायची—ही शिक्षकांचीं कर्तव्यें त्यांना पाठ होतीं—पण शिक्षकांनी संप पुकारायचा? म्हणजे शाळेला गिरणीचेंच स्वरूप आलें की? छे!—दोन तीन तरुणाचे हात फक्त वर गेले—बाकीच्या शिक्षकांत कुजबूज मात्र सुरू झाली.

“ हें पहा—” विजय जरा चिडून म्हणाला, “हें संपाचें कार्य व्हायला पाहिजे असेल तर तें संघटित झालं पाहिजे. चाळीस शिक्षकांची ती एकमुखी घोषणा पाहिजे. दहाबारा लोकांनी ती घोषणा करायची—व त्यांनी हुतात्मे व्हायचं ही गोष्ट मला बिलकूल मान्य नाही. तुम्ही सर्वजण या सत्तेला विरोध करायला तयार आहांत का–हें मला सांगा! त्यापैकी एकहि गळाला तरी संघटनेंत अर्थ राहाणार नाही—मग सभेचा काय निर्णय ठरला असं समजूं मी? ”

बराच वेळ कुणी उत्तर दिलं नाही. शेवटीं त्या शिक्षकांपैकी एक सीनियर शिक्षक उठून म्हणाले, “ मिस्टर देशपांडे, मला तुमची चीड आणि तळमळ समजते व आवडतेहि. पण तुमचं तरुण रक्त आहे, आणि त्यामुळे अशा जालीम योजना तुमच्याकडून पुढे याव्या यांत आश्चर्य नाही. पण आम्हाला प्रत्येक पाऊल पुढे टाकतांना विचार केला पाहिजे...”

“ यांचा अर्थ तुम्ही परत बोर्डाकडे लोटांगणं घालीत जाणार ना? ठीक आहे! ” विजय उठत म्हणाला, “ मला वाटलं होतं शिक्षकांची संघटना घडवून आणून मी वरच्या जुलमी सत्तेला विरोध करूं शकेन—पण शिक्षकांविषयींची माझी कल्पनाच चुकली. मोलाने मजुरी करणाऱ्या मजुरांचाहि अभिमान शिक्षकांजवळ नसेल अशी माझी कल्पना नव्हती. मग वरच्या सत्तेने तुम्हांला दडपून टाकण्याचा प्रयत्न केला तर तुम्ही कां कुरकुरावं हें कळत नाही. अच्छा! लिहा तुम्ही विनंत्या आणि अर्ज–” असें म्हणून तावातावाने विजय चालूं लागला

त्याचं मन खरोखर भडकलं होतं! आपण या शिक्षकांची संघटना

करून त्यांचीं दुःखं कमी करूं शकूं हीं त्याचीं स्वप्नें धुळीला मिळालीं. त्याने अधिकाऱ्यांकडून विरोधाची अपेक्षा केली होती. पण शिक्षकच शिक्षकाचे शत्रू असूं शकतील अशी त्याची कल्पना नव्हती.

आपल्याच तंद्रींत बाहेर पडत असतांना 'साहेब' अशी हांक त्याच्या कानावर आल्याने त्याने दचकून मागे पाहिलें. सोनबा हवालदार शाळेचा मुख्य गडी तिथे उभा होता.

" साहेब—जरा पलीकडल्या वर्गांत येता का? आम्हा पंधरा गड्यांची मीटिंग चालली हाय..."

विजय कांही न बोलतां त्याच्या मागोमाग गेला.

आणि वीस मिनिटांनी ज्यावेळीं बाहेर पडला त्यावेळीं त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचें हास्य झळकत होतें.

आणि दुसरेच दिवशीं 'शारदा हायस्कूल' मध्ये एक अघटित घटना घडून आली. शाळेच्या पंधरा शिपायांनी दहा रुपये महागाईभत्ता मिळाल्याखेरीज कामावर येण्याचें नाकारलें. सोनबा हवालदार व आणखी दोन गडी सकाळींच देशपांड्यांकडे जाऊन त्यांना आपला अर्ज देऊन व आपला निश्चय कळवून आले होते. डॉ. देशपांडे पुष्कळ संतापले—त्यांना कामावरून काढून टाकण्याची धमकी दिली. या अर्जांचा विचार करूं म्हणून भुलावणी लावली; पण त्याचा कांही परिणाम झाला नाही.

शाळेंत गडी नसल्याने किती कामें अडतात याची जाणीव डॉ. देशपांडे व शिक्षकवर्ग यांना त्या दिवशीं आली. घंटा वाजविण्याचें काम पुष्कळवेळां डॉ. देशपांडे एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन) यांना करावें लागलें. नोटिसा वर्गांतून फिरण्याच्या ऐवजी तशाच धूळ खात पडल्या—रजिस्टरवरील धूळ कारकुनाला झटकावी लागली—

दुसरे दिवशीं दुसरे गडी मिळविण्याचा डॉ. देशपाडे यांनी पुष्कळ प्रयत्न केला. पण या पंधरा जणांनी अगोदरच आपल्या संपाचा इतका गाजावाजा करून ठेवला होता की त्यांना बाहेर एकहि गडी मिळेना.

तीन दिवस शाळा कशीबशी चालली. शाळेंतील वर्गांत-वाचनाल-

यांत–व्हरांड्यांत केराचीं पुटें चढलीं होतीं--तरीहि आणखी तीनचार दिवस देशपांड्यांनी शाळा तशीच ढकलली असती.

पण तेवढ्यांत त्या जिल्ह्याचे न्यायाधीश बोर्डातील एका मेंबराच्या विनंतीवरून दोन दिवसांनी शाळेला भेट देणार असल्याचें त्यांना कळविण्यांत आलें.

आणि त्यानंतर डॉ. देशपांड्यांच्या जिवाची खरी धांदल उडाली. त्यांनी बोर्डाच्या अध्यक्षांना भेटून स्पेशल बोर्डाची सभा बोलावली–गड्यांच्या महागाई भत्त्याचा ठराव मतास टाकला व तो ताबडतोब मंजूर करून घेतला.

"पण आपण परवां शिक्षक व गडी या दोघांच्याहि महागाई भत्त्याबाबतचा ठराव नामंजूर केला होता." एक सभासद म्हणाला, "तेव्हा शिक्षकांनी तक्रार केली तर?"

"हं ऽ!" हेटाळणीच्या स्वरांत अध्यक्ष म्हणाले, "त्याची कोण इतकी पर्वा करतोय्! सांगू त्यांना तुम्हाला अगोदरच पुष्कळ पगार आहे म्हणून!"

यावर सर्व सभासदांनी माना डोलवल्या व तो प्रश्न निकालांत निघाला.

त्याच्या दुसरेच दिवशीं विजय राजीनामा देऊन शाळेच्या बाहेर पडला डॉ. देशपांड्यांनी शाळा सुटल्याबरोबर त्याला ऑफिसमध्ये बोलावून नेलें होतें व शिक्षकामध्ये संपाच्या कल्पना पसरवून त्यांच्यामध्ये असंतोष निर्माण करण्याचा आरोप त्यांनी त्याच्यावर ठेवला होता व त्याला त्याचें स्पष्टीकरण विचारलें होतें. या त्याच्या अपराधाबद्दल त्याने माफी मागितली नाही तर शाळेंतून काढून टाकण्याची धमकीहि त्यांनी त्याला दिली होती

या सर्वांचें उत्तर विजयने ताबडतोब राजिनामा खरडून दिलें होतें.

कशी कुणास ठाऊक—गड्यांना ती बातमी लागली—एका गड्याला त्यांनी हारतुरे आणायला पाठविले—दुसऱ्या गड्याने विजय देशपांड्यांना अडवून ठेवले.

आणि त्या दिवशीं संध्याकाळी शाळेंत दोन सभा चालल्या होत्या. एका सभेत गडी विजय देशपांड्याचा सत्कार करीत होते व सोनबा हवालदार व इतर दोन तीन गडी आपल्या ग्रामीण भाषेंत त्याचें गुणवर्णन करीत होते. दुसऱ्या सभेंत सारे शिक्षक एकत्र जमून ‘ गड्यांना महागाई-भत्ता देण्यांत आला—आता आमच्यावरही कृपादृष्टी वळवावी ’ अशा अर्थाचा अर्ज बोर्डाकडे सादर करण्याच्या गडबडींत होतें व अर्जाच्या खालीं ‘ आपले नम्र ’ असें लिहावें की ‘ आपले विनम्र सेवक ’ असें लिहावें याबद्दल त्यांची जोराची चर्चा सुरू होती.

आणि बाहेर रत्नापूरचा एक नागरिक आपल्या परगांवाहून आलेल्या मित्रांस सांगत होता. “ हेंच बरं कां तें शारदा हायस्कूल ! साऱ्या जिल्ह्या-मध्ये आदर्श शाळा समजली जाते ही—”



## फाटका पतंग : . ५

"आकाशांत भरारी घेणाऱ्या पतंगाप्रमाणेच या जगांत महत्त्वाकांक्षी माणसांची अवस्था होते. अनुकूल वाऱ्यामुळं वरवर जाणाऱ्या पतंगाला ज्याप्रमाणं आपलं ध्येय—स्वर्ग अगदीं जवळजवळ आल्यासारखं वाटतं, त्याचप्रमाणं बुद्धिमान् व ध्येयवादी माणसं बुद्धिमत्तेच्या व कर्तृत्वशक्तीच्या जोरावर पुढंपुढं येत असतांना त्यांनाहि आपण ध्येयशिखराच्या जवळ जवळ पोचलों असं वाटूं लागतं पतंगाप्रमाणंच आता आपलं ध्येय आपणाला लवकरच साध्य होणार अशा आनंदांत ते असतात. पण कुठपर्यंत? परिस्थितीच्या दोरीनं जोंपर्यंत त्यांना खाली खेचलं नाही तोंपर्यंत!" देशपांडे मास्तर शिकविण्यांत अगदी रंगून गेले होते. अगोदर दिवाकरांची 'फाटका पतंग' यासारखी उत्कृष्ट नाट्यछटा आणि त्यांत देशपांडे मास्तरांसारखा भाषेवर प्रभुत्व असलेला शिक्षक. त्यामुळे वर्ग जणु कांही वक्तृत्वाच्या ओघाबरोबर वाहून गेल्यासारखा दिसत होता. देशपांडे मास्तरांनी सर्व मुलांवरून एकदां दृष्टि फिरविली व आपलें विवरण पुढे चालूं केलें, "एकदा परिस्थितीचीं दृढ होत असलेलीं बंधनं माणसाला मागं खेचूं लागलीं म्हणजे डोळ्यांसमोर दिसणारीं सारीं ध्येयं स्वप्नांत दिसणाऱ्या देखाव्याप्रमाणं अंधुकअंधुक होत शेवटीं पार नाहींशी होतात आणि एका काळीं आकाशांत डौलानं मिरविणाऱ्या, पण आता बाभळीच्या झाडावर फाटक्या अवस्थेंत असलेल्या पतंगाप्रमाणं......"

पण इतक्यांत त्यांच्या वक्तृत्वामध्ये एकदम अडथळा आला. शाळेचे सुपरिंटेंडेंट कोणा एका सूट घातलेल्या व्यक्तीला बरोबर घेऊन एकदम वर्गांत शिरले. वर्गांतील सर्व मुलें उभीं राहिलीं.

" सिट् डाऊन " सुपरिंटेंडेंटनी मुलांना बसण्याची परवानगी दिली व पाहुण्यांकडे वळून माहिती देण्याच्या उद्देशाने ते सांगूं लागले, " हा पाचवी 'अ'चा वर्ग ! मराठीचा तास चालला आहे. हे मिस्टर देशपांडे. "

" अस्सं ! " हस्तान्दोलनाकरिता हात पुढे करीत पाहुणे उद्गारले. प्रत्येक वर्गांत त्यांचा तो ठराविक उपचारच होऊन बसला होता.

देशपांडेहि किंचित् हसत पुढे आले. आतापर्यंत त्यांनी त्या व्यक्तीकडे नीट पाहिलेंच नव्हतें. पण ज्या वेळीं त्या व्यक्तीच्या चेहऱ्याकडे त्यांचें लक्ष गेलें, त्या वेळीं एकदम आश्चर्यानें त्यांच्या भुवया विस्फारित झाल्या, चेहऱ्यावरचें हास्य पार लोपलें व त्याची जागा तिरस्काराने घेतली. संतापाच्या दोन तीन आठ्या कपाळावर दिसूं लागल्या. हस्तान्दोलनाकरिता पुढे केलेला हात नकळतच मागे आला आणि त्यांच्या तोंडांतून आपोआप आश्चर्याचा उद्गार बाहेर पडला, " कोण ? दिवेकर ? "

सुपरिंटेंडेंटनाच काय पण वर्गांतील साऱ्या मुलांना त्यांच्या चेहऱ्यांतील हा विलक्षण बदल पाहून आश्चर्य वाटूं लागलें. दिवेकरांनाहि त्यांच्या वर्तणुकीचा अर्थ कळेना. पण त्याहीपेक्षा जेव्हा देशपांडे मास्तरांनी टेबलावरचें पुस्तक उचललें व " क्षमा करा, मला या गृहस्थासमोर शिकवितां येणार नाही " असें म्हणून ते आकस्मिक रीतीने वर्गांतून बाहेर निघून गेले, त्या वेळी सर्वांच्या आश्चर्याला पारावारच उरला नाहीं.

* * *

देशपांडे संध्याकाळी घरीं आले ते अत्यंत विषण्ण मनःस्थितींतच ! वास्तविक घरीं आल्यावर त्यांचा नेहमीचा कार्यक्रम म्हणजे हातपाय धुऊन स्वयपाकघरांत जावयाचें. पत्नीशीं व दोघी बहिणींशीं इकडल्यातिकडल्या गप्पा मारावयाच्या आणि साडेसहा झाले की शिकवणीकरिता म्हणून बाहेर पडावयाचें ! शाळेंतील वेळापत्रकाप्रमाणेच घरच्या वेळापत्रकांत हा त्यांचा

दररोजचा जणु कांही आखीव कार्यक्रमच होता. पण आज मात्र हातपाय न धुतां आणि स्वयंपाकघरांत न डोकावतां एकदम ते आपल्या खोलींतच गेले व धाड्दिशी ईझिचेअरवर त्यांनी आपलें अंग टाकून दिलें. जणु कांही आतापर्यंत कसाबसा उसना टिकाविलेला जोर अजिबात नाहीसाच झाला होता. त्यांच्या दोघीहि बहिणी कुठे बाहेर गेल्या होत्या. त्यांच्या पत्नीने त्यांच्या आखीव कार्यक्रमांत पडलेला हा बदल पाहून ओळखलें, की आज शाळेंत विशेष कांहीतरी घडलें असावें ती त्यांच्या खोलींत गेली.

" कां ? आज प्रकृति बरोबर नाही वाटतं ?" तिने जवळ जाऊन कपाळाला हात लावला. " अय्या ! काय डोकं तापलंय् पण ! बाम चोळूं का डोक्याला ? "

" लीले, माझं डोकं शांत व्हावं असं खरोखरच तुला वाटतं का ? " देशपांडयांनी गंभीरपणे लीलेकडे पाहात तिला विचारलें.

" म्हणजे ! मला नाही अर्थ कळला या प्रश्नाचा ! " लीला या चमत्कारिक प्रश्नानं अगदी गोंधळून गेली.

" मग दोन तास मला अगदी स्वस्थ एकटं बसूं दे पाहूं ! दोन तास कुण्णी माझ्या खोलींत येऊं नका. एकांतवास हेंच या वेळी माझ्या डोकेदुखीवर खरं औषध आहे. "

लीला कांही न बोलतां खोलीबाहेर गेली आणि जातांना तिने हळूच बाहेरचा दरवाजा लोटून घेतला. तिला आपल्या पतीचा भावनाप्रधान स्वभाव ठाऊक झाला होता आणि अशा विषण्णतेच्या झटक्यावर एकांतवास हेंच आपल्या पतिराजांना खरेंखुरें औषध आहे हेंहि तिला अनुभवाने माहीत झालें होतें. त्यामुळे कांही न बोलतां ती मुकाट्याने खाली गेली.

ती गेल्यावर किती वेळ तरी देशपांडे उगीचच खिडकीबाहेर शून्य नजरेने टक लावून बसले होते. बाहेर कित्येक पतंग आकाशांत उडत असलेले दिसत होते. त्यांना दुपारीं वर्गात शिकविलेल्या 'फाटका पतंग' या नाट्यछटेची आठवण झाली. त्यांना वाटलें, " एके काळीं आपणहि असेच आकाशांत उंच उंच भरारी मारत होतों. किती उच्च ध्येय होतं त्या वेळीं आपलं ! आणि त्या पतंगाप्रमाणे आपल्या महत्त्वाकांक्षांहि किती जबर

होत्या ! पण आता ? फाटक्या पतंगाप्रमाणं आपल्याहि महत्त्वाकांक्षा पार जळून गेल्या आणि आज तर..."

एक दीर्घ निःश्वास टाकून त्यांनी शेजारी असलेल्या टेबलाचा खण उघडला व त्यांतून एक जाड वही बाहेर काढली. आतापर्यंत त्यांच्या आयुष्यांत घडलेल्या महत्त्वाच्या प्रसंगांचें वर्णन असलेली वही होती ती ! जणुं कांही मुख्य मुख्य टप्पे दाखविणारा त्यांचा संक्षिप्त जीवनेतिहासच होता तो ! त्यांनी शून्य नजरेने वही चाळली. मधेमधे पानांच्या घड्या करून वहीची त्यांनी निरनिराळ्या विभागांत विभागणी केल्याचें दिसत होतें. जणुं कांही त्यांच्या जीवनेतिहासाचे ते निरनिराळे खंडच होते. वही चाळतांचाळतां पहिल्या खंडांतील एका पानावर त्यांची नजर स्थिर झाली. विमनस्क नजरेने ते तें पान वाचूं लागले.

१४-७-३० स्तुति ही खरोखर दारूसारखी मादक आहे का ? मला तरी निदान आज असें वाटूं लागलें आहे. जिकडूनतिकडून स्तुतीचा माझ्यावर वर्षाव होतो आहे आणि त्यामुळे मला आनंदाने आज अगदी झिंगल्यासारखें झालें आहे. आज आमच्या कॉलेजमध्ये वादविवाद होता. 'मनुष्य हा परिस्थितीचा गुलाम की मालक ?' हा वादविवादाचा विषय होता. बहुतेक वक्त्यांनी मनुष्य हा परिस्थितीचा गुलाम आहे हें विधान आपल्या भाषणांत उदाहरणें देऊन पुढे मांडलें. उलट बाजूचीं भाषणें अगदी मिळमिळीत झाली. शेवटीं बोलण्याचा विचार नसतांनाहि मी उठलों आणि व्यासपीठावर जाऊन उभा राहिलों. तयारी न केल्याने भाषण कसें होईल कोण जाणे अशी सारखी भीति वाटतच होती; पण अतिशय सुंदर झालें माझें भाषण ! आत्मस्तुति नाहीं ही—पण भाषण इतकें मुद्देसूद झालें, की माझें भाषण झाल्यानंतर त्यांतील मुद्दे खोडून काढायला एकहि वक्ता पुढे येऊं शकला नाही. हीच माझ्या भाषणाची खरी कसोटी असें मला वाटतें. कांही वाक्यें तर माझीं मलाच इतकीं आवडलीं !

"मनुष्य जर परिस्थितीचा दास बनून राहिला तर मनुष्याचें मनुष्यत्व राहिलें कुठे ? त्यांच्यामध्ये आणि परिस्थितीला मान लवविणाऱ्या इतर चार पायी प्राण्यामध्ये फरक तो कुठे राहिला ? परिस्थितीपुढे मान लवविणें

हें दुर्बलतेचें लक्षण आहे आणि प्रतिकूल परिस्थिति असतांना देखील तिच्याशी टक्कर देऊन कार्यसिद्धि करणाऱ्यालाच आपण या जगांत शूर म्हणतों. अनुकूल परिस्थिति असतांना कार्य यशस्वी करून दाखविणें यांत पुरुषार्थ तो कसला ? पण नदी फोफावत चालली आहे, वारा उलट दिशेने वाहात आहे, नदीची प्रत्येक लाट आपल्या छातीवर येऊन आपटत आहे, अशा स्थितींत नदीच्या उलट प्रवाहाने पोहणारा माणूसच खरा शूर ! इतिहासांतील एकच उदाहरण मी देतों. शिवाजीने स्वराज्यस्थापनेची महूर्तमेढ रोवली त्यावेळी त्याला परिस्थिति कितपत अनुकूल होती ? आजूबाजूला बलिष्ठ यावनी राज्यें, दिल्लीची प्रमुख मोंगल सत्ता, आजूबाजूचे मराठे सरदार यवनांच्या अंकित झालेले—अशा प्रतिकूल परिस्थितींत शिवाजी परिस्थितीपुढे मान वाकवून इतर सरदारांप्रमाणे यवनांच्या ताब्यांतील सरदारांपैकी एक बनला असता तर त्याचें नांव तरी इतिहासांत आढळून आलें असतें का ? प्रतिकूल परिस्थितीशीं झुंज खेळून तीवर त्याने विजय मिळविला व स्वराज्याची स्थापना केली म्हणूनच शिवाजीचें नांव काढलें की आपली मान आदराने नम्र होते......"

आणखी किती तरी बोललों मी ! व्याख्यान चालू असतांना सारी सभा कशी चित्रासारखी स्तब्ध होती ! हजर असलेल्या सर्व प्रोफेसरांनी फार स्तुति केली. पण त्या स्तुतिगानापेक्षाहि सुधा कुलकर्णीच्या एकाच वाक्याने मला मनांत मावणार नाही इतका आनंद झाला. घरीं परत जात असतांना मुलींच्या घोळक्यांतून ती मुद्दाम माझ्याजवळ आली व म्हणाली, "किती सुंदर बोललांत हो तुम्ही !" किती मोहक आणि भ्रामक आशावाद होता आपला त्या वेळचा ! आपण केलेल्या विधानांना आपलें आयुष्यच केवढा मोठा विरोध आहे !

* * *

विचार करतांकरतांच त्यांनी वहीचीं कांही पानें उलटलीं. दुसऱ्या विभागाच्या पहिल्याच पानावर त्याचे डोळे स्थिर झाले. ते वाचूं लागले—

१०–५–३१ आज बालकवीच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जिकडे-तिकडे आनंदीआनंद पसरला असल्याचा मला भास होतो आहे. वरतीखाली,

जिकडेतिकडे मोद भरलेला आहे. आजच्या इतका आनंदी सूर्य मावळतांना मी कधीच पाहिला नव्हता आणि चंद्राने सुद्धा डोकें वर काढलें तें हसत-हसतच ! इतका आनंद देणाऱ्या दोन गोष्टी आज घडल्या आहेत, की वर्णनसुद्धा मला नीट करतां येणार नाहीत त्यांचें ! पहिली आनंदाची गोष्ट म्हणजे अपेक्षा करीत होतों त्याप्रमाणे बी. एस्सी. पहिल्या वर्गात पास झालों मी ! परिक्षेच्या निकालाची तार येईपर्यंत किती संशयांत होतें मन ! पोस्टमनच्या हातांतून तार घेऊन सही केली तीसुद्धा थरथरत्या हातानेच ! पण आंतील पहिल्या वर्गात आल्याची बातमी वाचतांच आनंदाने अस्मान ठेंगणे झाल्यासारखें झालें मला ! तसाच आमच्या केमिस्ट्रीच्या प्रोफेसरांना व प्रिन्सिपॉलना भेटून आलों मी ! दोघांनी माझें मनःपूर्वक अभिनंदन केलें. माझ्या मनांत फार दिवसांपासून घोळत असलेला कलर इंडस्ट्रीचा उच्च अभ्यास करण्याकरितां जर्मनीला जाण्याचा बेत मी प्रिन्सिपॉलना बोलून दाखविला. प्रिन्सिपॉलनी त्याला आपला पाठिंबा दिला व त्याकरितां रीसर्च स्कॉलर्शिप मिळवून देण्याची खटपट करण्याचें त्यांनी अभिवचन दिलें.

पण दुसरी जी आनंदाची गोष्ट आज घडली, तिच्या आनंदापुढे परिक्षेच्या निकालाचा आनंद कांहीच नाही. युनिव्हर्सिटीच्या परीक्षेंत पास झाल्याच्या आनंदाच्या कितीतरी पट आनंद आयुष्याच्या पूर्वपरिक्षेंत सुटल्याबद्दल मला झाला आहे. थोडक्यांत म्हणजे सुधेला मी आज मागणी घातली व तिने ती मान्य केली. एकच वाक्य, पण त्यामागे मनांतील किती आनंद दडला आहे याची कल्पनासुद्धा कुणाला यायची नाही. सुधा म्हणजे खरोखर माझ्या जीवनांतील सुधा आहे. मी माझें प्रेम व्यक्त केलें त्यावेळीं किती थरथरत होतें माझें मन ! तिच्या एका उत्तरावर माझ्या जीविताचा सहारा होणें किंवा नंदनवन होणें हें अवलंबून होतें ! सुधेशीं माझें जीवित इतकें निगडित झालें असेल अशी माझी आत्तापर्यंत कल्पना नव्हती. सुधेने होकारार्थी उत्तर दिल्यावर आनंदाच्या भरांत खोलींत नाचण्याचेंच काय ते मीं बाकी ठेवलें होतें. सुधा– माझी सुधा ! खरोखर व ती आता माझी होणार ! किती भाग्यवान् मी ! सुधा माझ्या जीविताची सहचरी होण्याचें भाग्य मला लाभणार ! पण...पण हें सारें गोड स्वप्न तर नाही ना मी पाहात ? स्वप्नसृष्टींतून आकस्मिक मी दारुण व भयद सत्यसृष्टींत तर नाही

ना येणार ? छेः ! मला अद्याप सुधेचे शब्द आठवतात. "तुम्हाला झालेल्या आनंदावरून कुणाला वाटेल मी एखादा देवताच आहे !" खरेंच, सहारा वाळवंटाचें नंदनवन करण्याची जिच्या अंगीं शक्ति आहे ती सुधा देवताच नाहीतर काय ?

भावी आयुष्यासंबंधीं आम्ही किती गोड चित्रें रंगविलीं ! जर्मनीहून आल्यावर रंगाचा कारखाना कुठे काढावयाचा, भांडवल कुणाजवळून घ्यावयाचें वगैरे बेतसुद्धा आम्ही आंखून ठेवले. कुणी तत्वज्ञानी तेथे असता तर म्हणाला असता, " किती वेडीं आहेत हीं पोरं ? भवितव्यतेच्या उदरांत काय दडलं आहे ह्याची अगोदरच चर्चा करीत बसलीं आहेत." पण कित्येक वेळा अशा वेडांतच किती सुख असतें याची त्या तत्त्वज्ञान्याला कुठून कल्पना येणार ?

पानें उलटतां उलटतां मध्येच एका पानावर ते थांबले. त्या वेळच्या हकीकतीच्या आठवणीने त्यांच्या कपाळावर किंचित् तिरस्काराची आठी दिसूं लागली. त्यांनी तें पान वाचायला सुरवात केली.

१२–९–३१ आज शेवटीं मी फेलोशिपचा राजीनामा देऊन मोकळा झालों. दोन दिवस सगळ्या कॉलेजांत या प्रकरणाची वाटाघाट चालली होती. पुष्कळांनी मला राजीनामा न देण्याचा उपदेश केला; पण धडधडीत अन्याय डोळ्यांसमोर दिसत असता तो सोसून स्वस्थ राहणें हें माझ्या स्वाभिमानाला बिलकूल सहन होत नाहीं आणि त्याचा निषेध करण्याकरितां तरी मला राजीनामा दिलाच पाहिजे होता.

वास्तविक सारी चूक त्या प्रोफेसरांची ! वर्गांत त्यांनी केलेली चूक शांतपणे त्यांच्या नजरेस आणीत असतांना त्यांनी अपमानकारक भाषा वापरायला नको होती. प्रोफेसर चुकले असतांना विद्यार्थ्यांने त्यांची चूक नजरेला आणणें यांत वास्तविक प्रोफेसरना अपमानकारक असें कांहीच नाही. ही चूक प्रोफेसर महाशय कबूल करतात. अपमानकारक भाषा वापरावयास नको होती हेंहि त्यांना पटतें; पण लेखी माफी मागायचें मात्र नाकारतात, याचा अर्थ काय ? आणि प्रिन्सिपॉलहि प्रोफेसरांची बाजू घेतात ! म्हणजे इथूनतिथून न्यायाची चाड कुणालाच नाही. प्रिन्सिपॉलकडे काल गेलों होतों तर

ते म्हणतात, 'तुमचा मुद्दा बरोबर आहे. अशी भाषा वापरल्याबद्दल प्रोफेसरनां-सुद्धा वाईट वाटतंय्. पण तुम्हीं म्हणतां तशी लेखी माफी तुम्हाला मिळणें शक्य नाही. कांहीं झालं तरी ते एक सन्मान्य प्रोफेसर आहेत. त्यांना दुखवून आम्हांला चालायचं नाही ' हीच जिथे त्यांची प्रवृत्ति, तिथे न्याया-न्यायाची अपेक्षा तरी कशी करावयाची माणसाने ? फेलोशिप्चा राजीनामा दिला म्हणजे माझें कांहीं मोठेंसें नुकसान होणार आहे असें नाही. रीचर्स स्कॉलरशिप मिळून मी जर्मनीला गेलों म्हणजे या फेलोशिपूला तशी फार किंमतहि राहणार नाही; पण हा प्रश्न नफानुकसानीचा नसून तत्त्वाचा आहे. तत्त्वाकरितां झगडत राहणे हेंच स्वाभिमानाचें खरें लक्षण आहे. कांहीं नाहीं तरी स्वाभिमानाला जागल्याचें तरी समाधान मिळालें. पण कां कुणास ठाऊक, सुधेला ही गोष्ट आवडल्याचें दिसत नाही. असें कां?

पुढील एका पानावर आल्याबरोबर ते थांबले तांबड्या शाईने ही तारीख लिहिली होती. विषण्ण नजरेने ते मजकुरावरून डोळे फिरवूं लागले.

१६–१०–३१ माझ्या जीवनांतील पहिलाच धरणीकंप हा! केवढा जबरदस्त धक्का दिला पण त्याने! ध्येयाची सर्व इमारत आज अगदी पूर्ण-पणे ढासळून पडली—सारीं मनोराज्यें पार वितळून गेली. भावी मनोरथ एक गोड सुखस्वप्न ठरलें त्या साऱ्याला कारण एक— वशिला!

रीसर्च स्कॉलर्शिपचा आज वर्तमानपत्रांतून जाहीर झालेला निकाल ऐकून क्षणभर माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासहि बसेना! ग. रा. दिवे-करला ती स्कॉलर्शिप मिळावी? बी. एस्सी सेकंड क्लासमध्ये पास झालेला सामान्य विद्यार्थी तो; केवळ वडिलांचा वशिला व पैसा या जोरावर ती रीसर्च स्कॉलर्शिप तो मिळवितो आणि पहिल्या वर्गात बी. एस्सी. पास झालेले, जर्मनीला जाऊन कांहीतरी विशेष कामगिरी करून दाखविण्याची ज्यांची महत्त्वाकांक्षा आहे असे विद्यार्थी मागे सारले जातात! जग कोणत्या न्याया-वर चाललें आहे हेंच मला कळेनासें झालें आहे.

निराशेच्या जबरदस्त तडाख्यामुळे कांही काळ मी बधिरच झालों. शुद्धीवर येतांच मी साऱ्या प्रोफेसर्सना व प्रिन्सिपॉलना जाऊन भेटलों; पण सहानुभूतीव्यतिरिक्त पुन्हा खटपट करण्याबद्दल कुणी शब्द उच्चारला

असेल तर शपथ! या ढोंगी जगाचा मला असा संताप आला आहे! योग्य त्याच विद्यार्थ्याला रीसर्च स्कॉलरशिप देण्याचें जाहीर करून शेवटीं वशिल्याचें तट्टूच पुढे काढणाऱ्या या जगाला न्यायान्यायाची तरी कितीशी चाड असणार? जगाची कशाला, प्रोफेसरांची व प्रिन्सिपॉलची तरी ढोंगी वृत्ति काय कमी आहे? आज हॉलमध्ये दिवेकरला निरोप देतांना केलेल्या त्यांच्या स्तुतिपर भाषणांत माझ्यावर झालेल्या अन्यायाचा एकाने तरी उल्लेख केला का? एकाळचे ते सहानुभूतीपर शब्द आणि आताचीं हीं दिवेकराचीं स्तुतिस्तोत्रें! सारें जग दुतोंडी आहे नुसतें!

संध्याकाळीं सुधेकडे गेलों—पण तीहि फारशी न बोलतां दिवेकरच्या सत्कारसमारंभाला निघून गेली. तिची ती बेपर्वाई वृत्ति जखमेवरील मिठा-प्रमाणे तीव्र आणि झणझणीत भासली मला! सहानुभूतीचे शब्द व तेहि प्रेमळ माणसाकडून ऐकायला आलेल्या मनाला त्या प्रेमळ माणसाची ती बेपर्वाई तापलेल्या सळीप्रमाणे बोचक वाटल्यास नवल नाही. सर्व जग उलटलें तरी माझी सुधा माझी बाजू घेईल अशी मनाची वेडी आशा मनांतच विरली.

निराशेच्या या धक्क्यामुळे अतिशय दुबळ्या झालेल्या मनाला असें वाटतें, की कुठेतरी एकांत ठिकाणी जाऊन खूपखूप रडावें. पण मला असें निरुत्साही बनून चालणार नाही. नदीच्या उलट प्रवाहाने पोहण्यांतच खरे शौर्य आहे. अद्याप एम्. एस्सी.ची परीक्षा कुठे गेली नाही.

* * *

पुढील एका पानावर वरतींच बारीक अक्षरांत तांबड्या शाईने 'आयुष्याचें दुसरें गोड स्वप्नहि विरलें' असें लिहिलें होतें. देशपांड्यांनी तिकडे आपली नजर वळाविली.

१९-१०-३१—आज दिवेकर व सुधा यांच्या अभिनंदनीय विवा-हाची बातमी ज्ञानप्रकाशमध्ये वाचली; पण या खेपेस निराशेचा इतका जबरदस्त धक्का बसला नाही. असें कांही तरी होणार हें तिच्या परवाच्या

वर्तनावरून वाटतच होतें. किती चुकीची परीक्षा केली मीं तिची ! एकदोन महिन्यांपूर्वी मीं तिला देवता समजत होतों. साधा चंचल मनाची मुलगी यापेक्षा तिची योग्यता अधिक नसावी ना ? दोन महिन्यांपूर्वी मला 'अढळ' प्रेमाची ग्वाही देणारी मुलगी आज दिवेकरला देखील तीच ग्वाही देत असेल; हें प्रेमाचें एक विडंबनच नाही का ? तिचें माझ्यावर प्रेम होतें की मला मिळूं घातलेल्या रीसर्च स्कॉलर्शिपवर प्रेम होतें, कोण जाणे ! पण ती चंचल होती म्हणून माझें तिच्यावरील प्रेम चंचल होऊं शकत नाही. तिच्या त्या लाघवी व प्रेमळ वर्तणुकीने ती माझ्या मनाला केवढा मोठा चटका लावून गेली याची तिला थोडी तरी कल्पना असेल का ? हं ऽ ! आयुष्याचें हेंहि गोड स्वप्न आज विरलें ! आता यापुढे रखरखीत वाळवंट...

* * *

यानंतर कां कुणास ठाऊक देशपांड्यांनी एकदम वही मिटली व शून्य नजरेने ते बाहेर उडत असलेल्या पतंगाकडे पाहूं लागले. भूतकाळचीं सारीं चित्रें जणुं कांही फिरून त्यांच्या डोळ्यांसमोरून जात होतीं. पांच मिनिटें विषण्ण नजरेने बाहेर दृष्टि लावून ते बसले होते. कांही वेळाने एकदम भानावर आल्यासारखें करून त्यांनी टेबलावर मिटवून ठेवलेली वही पुन्हा उचलली व त्यांतील तिसऱ्या विभागांतील पहिलेंच पान काढलें.

२–२–३२ चार महिन्यांत मी या वहीला शिवलोंहि नाहीं. वहींत लिहून त्याला कायम स्वरूप आणण्याची यातायात तरी आता कशाला ? एकुणतीस ऑक्टोबरला ज्वालामुखीचा एकाएकीं स्फोट झाला आणि ध्येयाची राहिलीसाहिली इमारतहि पार उध्वस्त झाली. एकाएकीं पित्याचें प्रेमळ छत्र डोक्यावरून नाहीसें झालें. दोन बहिणींना लग्न होईपर्यंत संभाळण्याची, शिवाय वडिलांनी केलेलें तीन हजारांचें कर्ज फेडण्याची जबाबदारी गळयांत पडली. हवेंत बांधलेले ध्येयाचे मनोरे आधार नसल्याने ढासळून पृथ्वीवर कोलमडले.

या तीनचार महिन्यांत आलेला जगाचा कटु अनुभव आणि पूर्वीचा आशावादी दृष्टिकोन यांमध्ये केवढी तरी तफावत दिसून येते ! अर्ज केला की नोकरी या माझ्या गोड मनोरथावर तीन महिन्यांच्या अनुभवाने

चांगलाच नांगर फिरविला. एम्. एस्सी. च्या परिक्षेंत पहिला वर्ग मिळवूं, दुसरी एखादी स्कॉलरशिप् मिळवून परदेशी जाऊं, या माझ्या गोड मनोरथांना परिस्थितीने अगदीच पायदळीं तुडविलें नाही का? पूर्वीचा माझा तो गोड आशावाद कुणीकडे आणि आताची नोकरीसाटी वणवण भटकत सगळीकडे 'न'काराचे टक्केटोणपे खाणाऱ्या माझ्या मनाची हल्लीची अवस्था कुणीकडे?

सर्व जग वशिल्यावर चाललें आहे हा माझा अनुभव या तीन महिन्यांत अधिकच दृढावला. लायकीपेक्षा वशिल्यालाच जिकडेतिकडे जास्त महत्व मिळतें. सगळ्या संस्था पालथ्या घातल्या मी! पण जिकडेतिकडे नकार! पण तोहि प्रत्यक्ष नाही. कुणीं "आम्हाला बी. टी. किंवा एस. टी. सी. पाहिजेत" म्हणून सांगूं लागले, कुणीं "अनुभव नाही" म्हणून अर्ज फेटाळून लावला, कुणीं विचार करण्याचें आश्वासन दिलें, तर कुणी "आमच्या संस्थेच्या बाहेरचे लोक आम्ही घेत नाही" असें चक्क सांगितलें. साऱ्यांचा अर्थ एकच! "तुमचा वशिला नाही, आम्ही तुम्हाला घेऊं शकत नाही." वशिल्याने आलेले दोन अनुभवी सामान्य पदवीधर एका शाळेंत लागलेले मला माहित आहेत आणि त्याच शाळेचे हेडमास्तर मला साळसूदपणे सांगत होते, "तुम्हाला शैक्षणिक पदवी नाही हो! तुम्ही बी. टी. होऊन या, तुमच्या अर्जाचा अवश्य विचार करूं!" कोण हा मानभावीपणा!

नोकरी तर केलीच पाहिजे! दोन जीव माझ्यावर अवलंबून आहेत—शिवाय कर्ज! पुण्यांत नोकरी मिळेल अशी आशा आता नाहीशी झाली आणि एम्. एस्सी. चीं स्वप्नेंहि त्याबरोबरच मावळलीं! ×× पूरची आलेली नोकरी पटकन् स्वीकारणें हाच आता शहाणपणाचा मार्ग! पुण्याला एम्. एससी. ला आणि त्याबरोबर उरल्यासुरल्या ध्येयालाहि शेवटचा रामराम! जगण्याकरिता धडपड हेंच आता आयुष्याचें ध्येय!

त्यानंतर एका वर्षानंतर एकदम लिहायला सुरवात केल्याचें दिसत होतें. देशपांडे पुढील पान वाचूं लागले.

१०–२–३३ शाळा म्हणजे ज्ञान देणारी अत्यंत पवित्र संस्था; पण

तेथेमुद्धा द्वेष, मत्सर, हेवा, भांडणें यांनी बुरसलेला अध्यापकवर्ग पाहिला की खरोखर मन अगदीं विषण्ण होऊन जातें.

जुना शिक्षक, वरचे वर्ग शिकविणारा शिक्षक, खालचे वर्ग शिकवणारा शिक्षक–असे अनेक तट! प्रत्येकजण दुसऱ्याची नालस्ती करीत असतो. कुणाला वरच्या इयत्ता मिळाल्या नाहीत म्हणून दुसऱ्याचा मत्सर वाटत असतो, तर कुणाला शिकवण्या न मिळाल्याने तो दुसऱ्याचा द्वेष करत असतो. त्यामुळे टीचर्स रूमचें पवित्र वातावरण इतकें गढूळ झालेलें दिसत असतें, की त्यांत पवित्र वातावरणाचा कुठे मागमूसहि शिल्लक राहिलेला नाही. जुने शिक्षक नव्या शिक्षकांना शिव्या देत असतात; नवीन शिक्षक जुन्या शिक्षकांच्या नांवाने खडे फोडीत असतात! उत्साहाने व कळकळीने विद्यार्थ्यांची सुधारणा होण्याकरिता जादा खटपट करणाऱ्या उत्साही शिक्षकांचा दोघेहि उपहास करीत असतात. मत्सर, चहाडी, तक्रारी, द्वेष या साऱ्यामुळे 'टीचर्स रूम' म्हणजे नुसती बजबजपुरी असते. मी म्हणतों असें कां? नोकरीच्या शृंखला प्रत्येकाच्या पायांत पडलेल्या आहेत, सर्वजण एकाच नावेंतून प्रवास करतों आहोंत, नोकरीच्या हाल-अपेष्टांची जाणीव व अनुभव प्रत्येकाच्या वांट्याला असतोच आणि त्याला भर म्हणून वर असमाधानी व कुचकी मनोवृत्ति कां? त्यांच्या अशा कुजक्या व क्षुद्र मनोवृत्तींचें वेळोवेळी होणारें प्रदर्शन पाहून असें वाटतें की "हाच का आपल्या राष्ट्राचे भावी आधारस्तंभ तयार करणारा अध्यापकवर्ग?" अर्थात् याला अपवाद आहेत. कांही शिक्षक विद्यार्थ्यांशीं समरस होऊन उत्साहाने काम करत असतात आणि अशांच्या पुढे मान आदराने नम्र होतेहि.

गुलामगिरी व स्वाभिमान एके ठिकाणीं राहूं शकत नाहीत हें किती खरें आहे! पूर्वी एका प्रोफेसराने माझी क्षमा मागितली नाही म्हणून मी फेलोशिपचा राजिनामा दिला. पण आता? पावलोपावलीं अपमानाचीं ताटें वाढून ठेवलीं असतां त्यांच्याकडे डोळेझाक करून वर पुन्हा प्रसन्नमुख ठेवून कर्तव्याला तयार व्हावें लागतें. अपमान हृदयाला जाचक असूनहि तो जाचक असल्याचें न दाखवितां चेहऱ्यावर हास्य ठेवणें हें केवढें दिव्य आहे!

असें वाटतें, की हे सारे पाश तोडून टाकून दूरदूर कुठेतरी जावें—या जगाला परत तोंड दाखवूं नये...... पण...!

माझ्या दुसऱ्या एका तत्त्वाला पांच महिन्यांपूर्वी मी चांगलाच हरताळ फासला. हुंड्याविरुद्ध मी केलेलीं भाषणें माझ्या कानांत दुमदुमत असतां वडिलांचें कर्ज फेडण्याकरितां तीन हजाराला जीव गहाण टाकून गावंड्यांच्या लीलेला मी सहचारी म्हणून घरांत आणलें. या व्यवहारी करारांत नशीब येवढेंच, की सहचरी मिळाली ती तरी गोड स्वभावाची मिळाली. दुसऱ्यांदा प्रेम करणें कितपत यशस्वी होतें कोण जाणे—मी मात्र हळूहळू त्या पोरीवर प्रेम करण्यास शिकतों आहें.

*            *            *

यापुढे देशपांड्यांना वाचवेना ! उद्विग्न मनःस्थितींत त्यांनी वही मिटवून टेबलावर फेकून दिली. खिडकीबाहेर शून्य दृष्टि लावून कितीतरी वेळ ते ईझिचेअरवर पडले होते. भूतकाळच्या साऱ्या चित्रांनी त्यांच्या हृदयांत कसा अगदी डोंब उडवून दिला होता. जणु कांही ध्येयें आणि महत्त्वाकांक्षा यांच्या पेटविलेल्या चिताच होत्या त्या ! "तुझं खरं जीवन आज संपलं" असेंच जणु कांही त्या चिता आपणाला सांगत आहेत असें त्यांना वाटूं लागलें. पण इतक्यांत, कां कुणास ठाऊक, ते एकदम उठले, त्यांनी वही उघडली, खिशांतून तांबड्या शाईचें पेन काढलें व लिहायला सुरवात केली. सुरवातीलाच त्यांनी मोठ्या अक्षरांत लिहिलें--

## अखेरचें पान

ध्येय आणि परिस्थिति यांच्या झगड्यांत परिस्थितीने माझ्यावर पूर्ण विजय मिळविला; मी हरलों. ध्येयशिखर चढतांचढतां पाय घसरून मी खोल कुठल्यातरी दरींत येऊन पडलों. पतंगाप्रमाणे स्वर्ग मिळविण्याची आकांक्षा धरली आणि शेवटी फाटक्या अवस्थेंत बाभळीच्या झाडावर येऊन आपटलों. यापेक्षा आता अवनति ती कोणती व्हावयाची राहिली ?

राहिल्यासाहिल्या स्वाभिमानाची आणि स्वतंत्र वृत्तीचीहि आज मी होळी पेटविली. माझ्या आयुष्यांतील अमोल संधि हिरावून घेणारा दिवेकर

माझ्या वर्गांत आला असतां संताप ताब्यांत ठेवतां न आल्याने मी वर्ग सोडून गेलों. हेडमास्तरांनी त्याबद्दल मला त्यांची माफी मागावयास सांगितली आणि...... आणि मी एखाद्या अपराध्याप्रमाणे त्या दिवेकराची क्षमा मागितली. यापलिकडील अधःपतनाची कोणती सीमा गाठणार मी ?

माझ्या या दुबळेपणाबद्दल, या अवनतीबद्दल शब्दांनी देखील बोलून दाखविता येणार नाही इतका तिटकारा मला स्वतःबद्दल वाटूं लागला आहे. जगण्यास देखील नालायक अशी माझी आज अवनति व्हावी यापेक्षा अधिक दैवदुर्विपाक कोणता ? पूर्वींचें ध्येय, स्वाभिमान, स्वतंत्र वृत्ति या पार कुठेतरी खोल गाडून टाकल्या गेल्या आणि त्याबरोबर पूर्वीचा अविनाशहि गाडला गेला. मृत असून जिवंत असलेल्या त्या अविनाशचें प्रतिबिंब फक्त शेष उरलें आहे. डायरीचें आता हेंच शेवटचें पान ! नाहीतरी परिस्थितीने पुढे वाढलेल्या भीषण भवितव्याशीं समरस होण्याचा प्रयत्न करण्यापलीकडे या फाटक्या पतंगाचें दुसरें कोणतें ध्येय या जगांत आता शिल्लक उरलें आहे ?

देशपांड्यांनी पेन खाली ठेवलें. त्यांचे डोळे अश्रूंनी भरून आले होते. दीर्घ निःश्वास सोडीत डोळ्यांतील अश्रु पुशीत त्यानी खिडकीबाहेर नजर टाकली. त्याच वेळी आकाशांत अतिशय उंच उडत असलेला एक पतंग दुसऱ्या पतंगाच्या दोरीने कापला गेल्यामुळे गिरक्या घेत खाली येत होता.

●●●

## विचित्र सूड : : ६

आज श्रीधरपंतांनी वर्गांत प्रवेश केल्याबरोबर त्यांच्या त्रस्त चेहऱ्याकडे पाहून मुलांनी ओळखलें की आज कांही तरी बिघडलें आहे.

वास्तविक पाहतां त्यांच्या तासाची मार्गप्रतीक्षा मुलें किती उत्सुकतेने करीत असत. मराठी शिकवितांना स्वतः त्यांत तन्मय होऊन जावयाचें व विद्यार्थ्यांनाहि तन्मय करून शिकवीत असलेला पाठ त्यांच्या मनावर अतिशय सुंदर रीतीने ठसवावयाचा ही हातोटी फारच थोड्यांना साधली होती. विशेषतः वक्तृत्वाची देणगी निसर्गतःच त्यांना असल्याने व तरल बुद्धिमत्तेची जोड तिला मिळाल्यामुळे प्रत्येक पाठांतून नवीन विचार व कल्पना काढून—नवीन वाद मुद्दाम उकरून काढून—त्या निमित्ताने पुष्कळ अवान्तर माहिती विद्यार्थ्यांना पुरवून श्रीधरपंत खरोखरच पाठाच्या पलीकडील केवढ्या अवाढव्य विश्वाची कल्पना विद्यार्थ्यांना देत आणि त्यामुळे त्यांचा तास म्हणजे विद्यार्थ्यांना चमचमीत मेजवानीच वाटत असल्यास नवल नाही. वर्गांत हास्यमुद्रेने प्रवेश करावयाचा व एकाद्या विनोदप्रचुर वाक्याने झालेल्या विषयासंबंधी कल्पना देऊन आपल्या हास्याचें प्रतिबिंब क्षणभर पन्नास चेहऱ्यांवर पाडावयाचें हा त्यांचा नेहमींचा शिरस्ता.

आणि विद्यार्थी आज त्यांची जास्त उत्सुकतेने वाट पाहत होते. कालच एक धडा शिकवितांना ‘सुख संपत्तीवर अवलंबून असतें का?’

हा वादग्रस्त प्रश्न निघाला होता, व त्यावर कांही चर्चा होण्याच्या आंतच घंटा झाली होती. श्रीधरपंतांनी या मुद्यावर आज विचार करून येण्यास सांगितलें होतें व त्याप्रमाणे दोनतीन मुलें मुद्दे काढून बोलण्याच्या जय्यत तयारीनिशीं आलीं होतीं.

म्हणूनच नेहमीचें हास्य ज्यावेळी त्यांना श्रीधरपंतांच्या चेहऱ्यावर दिसलें नाही त्यावेळी तीं कांहीशीं निराश झालीं.

श्रीधरपंत जड पावलाने टेबलाजवळ आले व कांही न बोलतां त्यांनी पुस्तक उघडलें.

अद्यापपर्यंत कधीच कांही तरी प्रस्ताव केल्यावांचून त्यांनी पुस्तक उघडलें नव्हतें. त्यामुळे विद्यार्थ्यांनासुद्धा तें चमत्कारिक वाटलें. यांतील एकदोन जण पुटपुटलींसुद्धा : ' आज सरना काय झालंय् कुणाला ठाऊक ?'

' सुख व संपत्ति ' वर श्रीधरपंतांचे अमोल विचार आपणाला ऐकावयास मिळणार या कल्पनेंत सर्व विद्यार्थी दंग होते. पण त्यांनी एक-दम पुस्तक उघडलेलें पाहून बहुतेकांची तीव्र निराशा झाली. त्यापैकी एक धीट मुलगा उठून उभा राहिला व म्हणाला, " सर, संपत्तीनं सुख मिळतं का यावर तुम्ही आम्हाला कांहीतरी सांगणार होतां. "

" संपत्तीवर सुख अवलंबून असतें का ? " जरा त्रस्त मुद्रेने त्या विद्यार्थ्याकडे पाहत श्रीधरपंत म्हणाले. त्यांना या वेळी या विषयाची आठ-वण करून दिल्याचें आवडलें नाही. " पण हा प्रश्नच तुमच्या मनात कां उत्पन्न व्हावा हें कळत नाही. संपत्ति हीच आजच्या मानवाच्या सुखाचें एकमेव स्थान होऊन बसली आहे. तुमच्या सभोंवतालीं जरा दृष्टि टाका. तुम्हाला दिसेल की ज्याच्याजवळ पैसा आहे तोच माणूस आज सुखी आहे. युद्धामुळे आज जीवनाला आवश्यक लागणाऱ्या जिनसांचे भाव तिपटीने-चौपटीने चढले आहेत. त्याची झळ श्रीमंतांना लागली आहे असें का तुम्हाला वाटतें ? श्रीमंत पैशाच्या जोरावर आज वाटेल ती जिन्नस वाटेल त्या प्रमाणांत घेऊं शकतो; पण गरिबांच्या झोंपडींत दोन प्रहरच्या अन्नाची विवंचना दिसते. बंगालमध्ये आज उपासमारीने शेकडों लोकांचे बळी पडत आहेत, त्यांतील कितीसे श्रीमंत असतील ? "

"पण सर, कालच्च तुम्हीं सांगितलंत, की संपत्तीपेक्षा मानसिक समाधानावर सुख अवलंबून आहे म्हणून!" मघांचाच मुलगा मध्ये उठून म्हणाला.

"होय, पण तें केव्हा? मनुष्याला मनुष्य म्हणून जगांत जगतां येईल तेव्हा; पण आज तेंच्च मनुष्याला अशक्य झालें आहे. नाण्याच्या आवाजावर आज जगांतील सारीं भुतें नाचत आहेत आणि हा आवाज ज्याला काढतां येत नाहीं त्याला स्वतःच्या भावाचा प्राणदेखील...' एकदम श्रीधरपंतांना हुंदका आला. कसल्या तरी आठवणीने त्यांचे डोळे भरून आले. आपण वर्गांत आहोंत याचाहि त्यांना विसर पडला!

सारा वर्ग निःस्तब्ध होता. त्यांना हें दृश्य अगदी नवीन होतें. श्रीधरपंतांच्या डोळ्यांत अश्रु दिसण्याला तशीच कांही तरी विलक्षण घटना झाली असली पाहिजे याची प्रत्येक विद्यार्थ्याला कल्पना होती; मनांतून श्रीधरपंताविषयी अत्यंत हळहळ वाटत असूनदेखील आपण त्यांचें दुःख कमी करण्यास असमर्थ आहोंत ही दुबळेपणाची जाणीव प्रत्येक चेहऱ्यावर दिसत होती.

एक–दोन मिनिटांनी आपण आपल्या मनावरचा ताबा अगदीच सोडला या कल्पनेने शरमून श्रीधरपंतांनी पुस्तक उचललें व निर्जीवपणाने वाचण्यास सुरुवात केली. श्रीधरपंत वाचीत होते व विद्यार्थ्यांच्या नजरा पुस्तकावरून फिरत होत्या. पण दोघांनाहि आपण काय शिकवतों किंवा काय शिकतों याचा पत्ता नव्हता. दोघांचीहि मनें जाग्यावर नव्हतीं.

तासाची घंटा झाली; श्रीधरपंतांनी पुस्तक मिटलें व सुटकेचा निःश्वास टाकल्यासारखे करून ते टीचर्स रूमकडे वळले.

टीचर्स रूममध्ये लोडावर मान टाकून शून्य दृष्टीने आढ्याकडे पाहात असतांना किती तरी दृश्यें त्यांच्या मनश्चक्षूंपुढून जात होतीं.

शिक्षकाचा पेशा पत्करण्यापूर्वी त्यांना अतिशय चांगली अशी सरकारी नोकरी मिळण्याची संधि आली होती; पण कायदेभंगाच्या चळवळीमुळे स्वार्थत्यागाच्या कल्पना त्यांच्या मनांत भरल्या होत्या व त्यामुळे

अतिशय कमी वेतनावर त्यांनी शाळेत शिक्षणाचा पेशा पत्करला होता. किती मनोरम स्वप्नें त्यांनी डोळ्यांसमोर उभारलीं होतीं ! आपल्या विद्यार्थ्यांतून तेजस्वी तरुण पिढी निर्माण करण्याची त्यांची अतिशय तीव्र इच्छा होती. पैसा हें मानवी जीवनाचें ध्येय होऊं शकत नाही—राष्ट्राला आज जिवंत विचारांची, तेजस्वी व कार्यक्षम अशी तरुण पिढी पाहिजे व ती पिढी निर्माण करण्याची जबाबदारी शिक्षकावर आहे या विचारानें ते संपत्तीला लाथ मारून शाळेच्या विश्वांत शिरले होते. या चिमण्या जीवांच्या किलबिलाटांत त्यांचा पहिला दिवस किती गमतींत गेला ! आज एकशे साठ निष्पाप बालकांमध्यें राष्ट्रप्रेम निर्माण करून त्यांच्या मनांत चैतन्याची ज्योत लावण्याची संधि आपणाला मिळाली, याबद्दल त्यांना किती आनंद झाला !

पण तो आनंद क्षणजीवीच ठरला. आपल्या ध्येयाकरिता शाळा नाही—शाळेकरिता आपण आहोंत याची त्यांना जाणीव करून देण्यांत येऊं लागली. परदेशाहून शिक्षणाची पदवी घेऊन आलेले व इतर शिक्षकांवर देखरेख करण्यास नेमलेले तज्ज्ञ त्यांच्या वर्गावर जाऊन ‘ शिकवावें कसें ? ’ याचे त्यांना धडे देऊं लागले. तन्मयतेने त्यांनी शिकविलेले पाठ विद्यार्थ्यांना कितीहि आवडले, तरी तज्ज्ञांच्या दृष्टीने ते अगदीं कनिष्ट समजण्यांत येऊं लागले व आपली शिकविण्याची पद्धति बदलून ‘ प्रत्यक्ष ’ पद्धतीचा अवलंब करण्याविषयी त्यांना वारंवार इषारा मिळूं लागला.

याहीपेक्षा दुसरा अनुभव त्यांना हळूहळू येऊं लागला. पहिल्या तीन–चार दिवसांत ‘ आपलें राष्ट्र, ’ ‘ आपला हिंदुस्थान, ’ ‘ स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न, ’ ‘ देशप्रेम ’ इत्यादि बरेच जालीम शब्द श्रीधरपंतांच्या तोंडून वर्गांत निघालेले हेडमास्तरांच्या कानांवर आले. त्यांनी लागलीच त्यांना बोलावून सांगितलें, “ हें पाहा गोडबोले, आम्हाला सरकारकडून मिळत असलेली ग्रँट कायम टिकवावयाची आहे, आणि आमच्या शाळेंत सरकारी अधिकाऱ्यांचीं बरींच मुलं आहेत. तेव्हां कृपा करून तुम्ही तुमची राष्ट्रीय वृत्ति वर्गांत व्यक्त न करण्याची खबरदारी घ्याल तर बरें होईल. ”

आणि त्यानंतर त्यांच्या वर्गाकडे हेडमास्तरांची कृपादृष्टि अधिकाधिक वळूं लागली.

शिक्षकांच्या बाबतींत त्यांना निराळाच अनुभव आला. नवीन तेजस्वी तरुण पिढी निर्माण करण्याचें ज्यांच्या हातांत आहे, अशा शिक्षकांबद्दल त्यांच्या कल्पना फार निराळ्या होत्या. पण प्रत्यक्ष त्यांना निराळेंच दिसलें. बहुतेक सारे शिक्षक रंजलेले, बुरसलेले व आहे तेवढ्या भांडवलावर त्याच त्याच रेकॉर्ड फिरून ऐकवणारे त्यांना दिसले. विद्यार्थ्यांना स्फूर्ति देण्याइतकें चैतन्य कोणाजवळ नव्हतें. विद्यार्थ्यांना नवीन ज्ञान देण्यासाठी कष्ट करण्याची इच्छा कोणामध्ये दिसत नव्हती. राजकारण व जागतिक परिस्थिति यांवरील त्यांचे विचार ठराविक साच्याचे होते. थोडे अपवाद सोडले, तर खरोखर जिवंतपणा, तडफ, स्वतंत्र वृत्ति व राष्ट्रीय भावना कोणामध्येहि नव्हती. अधिकाऱ्याने केलेली प्रशंसा हाच त्यांचा अभिमान, पगारांत बढती हाच त्यांचा आनंद व इन्स्पेक्टरचा उत्तम शेरा हा त्यांचा ब्रह्मानंद हीच मुळी बहुतेकांची वृत्ति ! सहज श्रीधरपंतांच्या मनांत विचार आला, " हे का आमची नवीन पिढी निर्माण करणार ? "

विद्यार्थ्यांच्या बाबतींत मात्र त्यांना पूर्ण समाधान मिळालें. आल्या दिवसापासून श्रीधरपंतांची विद्यार्थ्यांवर अगदी विलक्षण छाप बसली आणि त्यामुळे त्यांच्या प्रत्येक शब्दाला—नव्हे प्रत्येक कृतीला शाळेंत महत्त्व येऊं लागलें. श्रीधरपंत खादी वापरतात म्हणून पुष्कळांनी खादी वापरण्यास सुरवात केली; श्रीधरपंतांना अव्यवस्थितपणा, उद्धटपणा व अनियमितपणा आवडत नाही हें कळल्याबरोबर विद्यार्थीवर्गातून हे सारे दुर्गूण नाहींसे होऊं लागले. मराठी वाङ्मयाची त्यांना आवड आहे हें कळल्यावर विद्यार्थ्यांमध्ये मराठी वाङ्मयाचा अभ्यास करण्याची इर्ष्या सुरू झाली. इतर शिक्षकांचें छड्यांनी जें काम होत नसे तें श्रीधरपंतांच्या केवळ कटाक्षाने होऊं लागलें.

श्रीधरपंतांना एक गोष्ट आठवली. त्यांच्या वर्गात गोडबोले नांवाचा एक मुलगा होता. त्याचे वडील श्रीमंत होते, पण मुलाकडे त्यांचें दुर्लक्षच होतें. त्यामुळे कांही उनाड कंपूंत तो सापडला. सिगरेट ओढण्यापर्यंत मजल

जाऊनच तो थांबला नाही, तर एकदा बीरचाही आस्वाद आपल्या मित्रांच्या आग्रहासाठी त्याने घेतला. अशा स्थितीत कांहीसा झिंगत रस्त्याने जातांना ज्या वेळी श्रीधरपंतांनी त्याला पाहिलें, तेव्हा त्यानी दुसरें—तिसरें कांही केलें नाही. रस्त्यावरच फाड्दिशीं त्याच्या मुस्काटांत ठेवून दिली व त्याला हाताला पकडून घरीं त्याच्या वडिलाच्या स्वाधीन केला. दुसऱ्या दिवशीं त्याची वर्गांत चांगलीच हजेरी घेतली. पण गोडबोले म्हणजे निढावलेला बेरडच ! ‘ नासका बटाटा ’ म्हणूनच तो इतर शिक्षवर्गांत प्रसिद्ध होता. तो श्रीधरपंतांना थोडाच दाद देणार ? उलट दुसऱ्या दिवशीं आपल्या उनाड मित्रांच्या प्रोत्साहनाने तो बीर पिऊनच वर्गांत आला. तेव्हां कधी न संतापणारे श्रीधरपंत चांगलेच संतापले. त्यांनी ऑफिसमधून छडी मागवून त्याला झोडपून काढलाच; पण हेडमास्तरांना सांगून त्याची वर्गावर्गांतून धिंड काढवली. याच्याहिपुढे जाऊन त्यांनी त्याला उनाड संगतींतून वांचवण्यासाठी त्याच्या वडिलांना त्याचें नांव शाळेंतून काढायला लावलें व पांचगणीसारख्या दूर गांवीं बोर्डिंगमध्ये त्याला ठेवायला लावलें. हें सारें होत असतांना गोडबोले मनांतल्या मनांत अगदी जळफळत होता. “श्रीधरपंतांनी माझा अपमान केला आहे. त्यांना म्हणावं पाहून घेईन.” असे उद्गार दोनतीन विद्यार्थ्यांजवळ त्याने काढल्याचे त्यांनी ऐकले होते पण त्याबद्दल श्रीधरपंतांना कांही वाटत नव्हतें. गोडबोलेला सन्मार्गावर आणण्याच्या दृष्टीने आपण केलें तें योग्यच केलें याची त्यांना मनोमय खात्री होती. त्याच्या रागाची त्यांना पर्वा नव्हती; पण त्याला आपण व्यसनाच्या गर्तेतून वाचवलें याच कल्पनेने त्यांच्या चेहऱ्यावर मंद हास्य चमकूं लागलें.

या गोडबोल्याचें एक उदाहरण सोडून दिल्यास त्याच्या या वीस वर्षांच्या कारकीर्दींत विद्यार्थ्यांचें अकृत्रिम प्रेम त्यांनी निःसंशय संपादन केलें होतें. विद्यार्थ्यांशीं वागण्याची त्यांची रीतच अशी होती की त्यामुळे विद्यार्थ्यांच्या मनांत त्यांच्याविषयी आत्यंतिक आदराबरोबर एक प्रकारचा विश्वास निर्माण व्हावा. श्रीधरपंतांकडे त्यांचे किती तरी आजी व माजी विद्यार्थी आपल्या खाजगी अडचणी घेऊन मार्गदर्शनासाठी येत व किती तरी विद्यार्थ्यांना श्रीधरपंतांनी उत्तेजन देऊन विविध कार्यांत भाग घेण्यास लावलें होतें. विविध तऱ्हेचीं चित्रें त्यांच्या डोळ्यांसमोरून सरकूं लागलीं. एकदा कांही

वादग्रस्त प्रश्नामुळे विद्यार्थ्यांनी गॅदरिंगवर बहिष्कार घालण्याचें ठरवलें असतां श्रीधरपंतांना पुढें करून तो पेचप्रसंग हेडमास्तरानी कसा सोडवला हें त्यांना आठवलें. विनायक रानडे नांवाचा विद्यार्थी फार्म भरण्यास पैसे नसल्यामुळे परीक्षेला बसत नव्हता. त्या वेळी श्रीधरपंतांनी विद्यार्थ्यांना वर्गणी करावयास लावून व राहिलेले पैसे स्वतःचे भरून त्याची सोय केल्याचा प्रसंग त्यांना आठवला. एकदा एका वक्त्याचें व्याख्यान नीरस झाल्यामुळे मुलांनी व्याख्यानाच्या वेळी गोंधळ केला होता आणि त्याबद्दल दुसऱ्या दिवशीं श्रीधरपंत वर्गात त्यांना अतिशय बोलले. त्यावर मुलांना अतिशय वाईट वाटून त्यांनी हेडमास्तरांची क्षमा मागितलीच, पण त्यांच्यापैकी एकाने वक्त्याकडे जाऊन सर्व विद्यार्थ्यांतर्फे त्यांची क्षमा मागितली. खोटें बोलणाऱ्या विद्यार्थ्याला ते एकदा म्हणाले, "तुझ्याकडून मी अशी अपेक्षा केली नव्हती." तो विद्यार्थी त्यांच्या घरी आला व पुन्हा कधीहि खोटें न बोलण्याचें त्याने त्यांना वचन दिलें.

—अशा एक ना दोन, अनेक आठवणीचे पट त्यांच्या दृष्टीसमोरून जात होते.

पण दुर्दैवाने या त्यांच्या विद्यार्थीप्रियतेचें कौतुक शाळेने कोणत्याच प्रकारे केलें नव्हते. उलट इतर अधिकाऱ्यांकडून त्यांना खाली ओढण्याचे प्रयत्न मात्र शिस्तवार चालू होते! त्यांच्या शिकविण्याच्या पद्धतींत 'प्रत्यक्ष' पद्धतीचा लेशहि नसल्याचा ठपका त्यांना वारंवार देण्यांत येई त्यांच्या निबंध-वह्यांत इतर कोणतेच दोष काढतां येत नसले, तर अभ्यासक्रमांत ठरलेल्या विषयावर त्यांनी निबंध लिहून घेतले नाहीत, असा आरोप त्यांच्यावर ठेवण्यांत येई. त्याची लोकप्रियता ज्यांच्या डोळ्यावर येई, ते त्यांचा 'विद्यार्थ्यांचे खुषमस्करे' म्हणूनहि कुचेष्टेने उल्लेख करीत; पण श्रीधरपंतांनी या सर्व गोष्टीकडे पूर्ण पाठ फिरविली होती. विद्यार्थी हेच शिक्षकाच्या कौशल्याचे खरे बॅरोमिटर्स आहेत हें तें जाणून होते व जोंपर्यंत विद्यार्थी आपल्या शिक्षणावर संतुष्ट आहेत व जोंपर्यंत आपण आपलें काम अत्यंत चोखपणे व विद्यार्थ्यांचें अंतिम हित दृष्टीसमोर ठेवून करतों आहोंत, तोपर्यंत असल्या शेऱ्याची व निंदेची बिलकूल पर्वा करावयाची नाही; हेंच श्रीधरपंतांचें धोरण होतें.

पण विद्यार्थ्यांमधील लोकप्रियता शिक्षकाच्या पगारांत कधींच वाढ करूं शकत नाही. श्रीधरपंत हे एका संस्थेच्या नियमाच्या चरकांत सांपडले होते व शैक्षणिक पदवी किंवा डिप्लोमा मिळविल्याखेरीज त्यांना पगारवाढ मिळणें शक्य नव्हते. आपण, आपली पत्नी, लहान मुलगा व आईबापा-विरहित वाढविलेला त्यांचा लाडका धाकटा भाऊ, या साऱ्यांचा प्रपंच एरवीच्या काळात आतापर्यंत पंचावन्न रुपयांत चालविणें शक्य झालें— आणि श्रीधरपंतांना जास्त पैशाची आवश्यकताहि कधीं वाटली नाही. सकाळीं सातपासून रात्री दहापर्यंत शिकवण्या करून जिवाचे रान करायचें व पैसा मिळवायचा, हा हव्यास त्यांना कधीच नसे. शिकवण्या करण्यांतहि त्यांचा ध्येयवाद असे. गरीब व योग्य अशा मुलांच्या शिकवण्या घ्यावयाच्या. पैशाची घासाघीस कधीच करावयाची नाही. पैसे दिले नाही तरी एका शब्दानेही विद्यार्थ्याला दुखवायचें नाही. या साऱ्या गोष्टीमुळे त्यांच्याकडे पैसे देणाऱ्या विद्यार्थ्यांपेक्षा न देणारे नादार विद्यार्थीच पुष्कळ असत, व त्यांतच श्रीधरपंतांना समाधान मिळत असे. सुरवाती-सुरवातीला त्यांना हें जाचक झालें नाही. साधी राहणी व समाधानी वृत्ति हेंच मुळी त्याचें ब्रीदवाक्य असे. सुदैवाने त्यांची पत्नी व धाकटा भाऊ हेहि त्यांच्या विचाराशी अगदी एकरूप असत. त्यामुळे या सुखी संसारांत पैशाचा प्रश्न कधीच उत्पन्न झाला नाही.

—पण लढाई सुरू झाली. परिस्थिति बदलली. प्रत्येक गोष्टीचे भाव कडाडले. जीवनाला आवश्यक अशा कांही जिनसा तर बाजारांत विकत मिळेनाशा झाल्या. काळ्या बाजारात त्यांना वाटेल ती किंमत सांगण्यांत येऊं लागली. श्रीधरपंतांच्या संसारावर या साऱ्याचा विलक्षण परिणाम झाला. श्रीमंतांना श्रीमंतीमुळे कोणत्याच गोष्टीची वाण भासत नसे. मध्यम वर्गातील ज्या लोकानी पैसे शिल्लक ठेवण्याची काळजी घेतली होती, त्यांना आपल्या शिलकेवर भिस्त ठेऊन कां होईना, पण आला दिवस कसा तरी साजरा करतां येत होता. पण ज्यांनी आजपर्यंत कांही शिल्लक ठेवली नव्हती–किंबहुना ज्यांना अद्यापपर्यंत शिल्लक ठेवण्याला सवड मिळाली नव्हती, अशा श्रीधरपंतांसारख्या लोकांचें मात्र खरें नष्टचर्य ओढवलें होतें. महागाईभत्त्यासह श्रीधरपंतांना मिळणारे साठ रुपये या वाढत्या महागाईला

कितपत पुरून उरणार? त्यांतच त्यांच्या पत्नीच्या बाळंतपणाचा व त्यांतील दुखण्याचा खर्च! या सर्व खर्चांना तोंड देण्याची श्रीधरपंतांनी पराकाष्ठा केली होती. शक्य होतें—तितकें कर्ज त्यांनी शाळेकडून घेतलें होतें. हितचिंतकांनी त्यांना उसनवारीच्या रूपाने, त्यांच्या स्वाभिमानाला धक्का न लावतां, शक्य तें सहाय्य केलें होतें आणि तरीहि त्यांची गाडी अद्याप रुळावर आली नव्हती.

पण श्रीधरपंत खरे आशावादी! या जबरदस्त परिस्थितीशीं ते हंसतमुखाने टक्कर देत होते. या दिवसांतूनच पुढें देशाला कांही तरी चांगले दिवस यावयाचे आहेत असा त्यांचा दुर्दम्य आशावाद त्यांना सांगत होता. आपणापेक्षां हलाखीच्या स्थितींत आज कित्येकांना दिवस काढावे लागत आहेत आणि तोंपर्यंत आपणाला कुरकूर करण्याचें कांहीच कारण नाही हें तत्त्व त्यांनी कुटुंबियांतील सर्व व्यक्तींना पटविलें होतें. आणि म्हणून या विलक्षण दिवसांत पैशाचें पाठबळ अजिबात नसतांनासुद्धां—श्रीधरपंतांच्या संसारांतील प्रत्येक व्यक्ति समाधानाने आल्या दिवसाला तोंड देत होती.

—पण दैवाने त्यांचा चांगलाच पाठपुरावा करण्याचें ठरवलें होतेसें दिसतें. शिवाशिवीचा खेळ खेळत असतां शाळेंत त्यांच्या धाकट्या भावाचा–मधूचा–पाय एकदम जिन्यावरून घसरला व प्रत्येक दगडी पायरीशीं टक्कर घेत अतिशय वेगाने तो खालीं आपटला. जिकडे तिकडे धांवाधांव–गडबड सुरू झाली. मधूला ताबडतोब जवळच्या दवाखान्यांत पोंचविण्यांत आलें. मधूच्या शाळेपासून श्रीधरपंतांची शाळा दोन मैल अंतरावर होती; पण विलंब होऊं नये म्हणून त्यांना बोलावण्यासाठीं मोटर पाठविण्यांत आली.

मधूची ती अवस्था पाहून श्रीधरपंतांचें हृदय फाटलें–लहान मुलांसारखे ते ओक्साबोक्शीं रडूं लागले. आणि डॉक्टरनांसुद्धा त्यांचे समाधान करतां येईना. डोक्याला झालेल्या तीन चार जखमा–डाव्या मांडीचें हाड मोडलेलें व छातीला लागलेला विलक्षण मार, हें सारें समोर दिसत असतांना डॉक्टर तरी कोणत्या शब्दांत समाधान करणार? त्यांनी सहानुभूतिपूर्वक त्यांच्या खांद्यावर हात ठेवला व म्हटलें, " मला फार वाईट वाटतं;

पण आमच्याकडून आम्ही शक्य ती खटपट करूं याची खात्रीं असूं द्या.” श्रीधरपंतांनी कांहीं न बोलतां फक्त कृतज्ञतेने अश्रुपूर्ण नयनांनी त्यांच्याकडे पाहिलें.

आणि त्यानंतरचे चारपांच दिवस एकाद्या भयानक स्वप्नाप्रमाणे गेले. मधूला खाजगी हॉस्पिटलमध्ये ठेवण्यांत आलें. ‘एक्स रे’ने त्याच्या मांडीचे व छातीचे फोटो घेण्यांत आले; तीनचार डॉक्टरांनी एकत्र फोटो पाहिले त्यांनी मधूला पुन्हां तपासलें. आशेने त्यांच्या निर्णयाची वाट पाहणाऱ्या श्रीधरपंतांना त्यांनी दुसऱ्या दिवशी येण्यास सांगितलें.

—तोंपर्यंत श्रीधरपंतांची समजूत होती की या तीन डॉक्टरांच्या उपाययोजनेने मधूला बरें वाटेल. तिघेहि नाणावलेले डॉक्टर होते आणि त्यांपैकी एकाने तर त्यांच्या पत्नीला बरें केलें होतें. श्रीधरपंतांचा दुर्दम्य आशावाद अद्याप तग धरून होता. मधू शुद्धीवर आला म्हणजे असह्य वेदनेने तळमळायचा; त्या त्याच्या वेदना त्यांना ऐकवत नसत. तरी पण त्याची समजूत करून त्याला धीर देण्याचें कठीण काम ते करीत होते. पत्नीच्या डोळ्यांना सतत लागलेली अश्रुधारा त्यांनी आशायुक्त शब्दांनी थांबलेली होती. इतकेंच नव्हे, तर ते दुपारीं शाळेंत गेले होते व एका वर्गात “सुख संपत्तीवर अवलंबून असते का?” हा मनोरंजक वादविवादहि त्यांनी उकरून काढला होता.

पण आज सकाळीं त्यांचीं आशावादाचीं सारीं स्वप्नें पार भंगलीं. मधूच्या दुखण्याच्या गंभीर स्वरूपाची कल्पना आतापर्यंत त्यांना नीटशी नव्हती हेंच खरें! दवाखान्यांत गेल्यावर डॉक्टरांनी त्यांना शेजारच्या खुर्चीवर बसवलें व म्हटलें, “श्रीधरपंत, कसं सांगावं तुम्हाला हेंच मला कळेनासं झालं आहे; काल आम्ही पुन्हा मधूच्या छातीचा व मांडीचा एक्स रेनं फोटो घेतला—पण अगदी असाध्य केस आहे; घाबरूं नका, नीट ऐकून घ्या मी काय म्हणतों तें. छातीच्या खालच्या दोन फांसळ्या मारामुळे मोडल्या आहेत. मांडीचं हाड तर मोडलंच आहे, पण हाडाचा वरचा भाग पिचला आहे; ऑपरेशन करूनच या गोष्टी नीट करतां येणं शक्य आहे. पण अशा रीतीचं ऑपरेशन आज एका डॉक्टरशिवाय कुणाला जमणार नाहीं...”

" कोण...कोण डॉक्टर तो ? मला नाव सांगा, मी ताबडतोब त्याला घेऊन येण्याची व्यवस्था करीन; पण डॉक्टर, माझ्या लाडक्या मधूचे प्राण वांचले पाहिजेत हो ! " श्रीधरपंत काकुळतीने बोलत होते.

" मी म्हणतों ते डॉक्टर तुमच्या मधूचा प्राण ताबडतोब वांचवूं शकतील. पण......" डॉक्टर मध्येच थांबले

" पण काय ? येणार नाहीत का ते इथं ? काय नांव त्यांचं ? " अधीरतेने श्रीधरपंतांनी विचारलें.

" मुंबईच्या डॉ. गोडबोल्यांचें नांव तुम्हीं ऐकलं असेल; नुकतेच ते इंग्लंडहून आलेले आहेत. पण दोन हजार रुपये हातांत रोख पडल्याखेरीज तो जागचा हालायचा नाही ! फार ख्याति आहे त्यांची त्याबद्दल जितका कुशल तितकाच पैशाचा लोभी ! मधूला तर जागचं हालवणं शक्य नाही, आणि त्यांना इकडे आणायचं म्हणजे दोन हजाराखाली......"

" दोन हजार..." स्वप्नांत असल्याप्रमाणे श्रीधरपंत म्हणाले. आज मधूच्या दुखण्याकरतां इकडून तिकडून उसने काढून त्यांनी दोनशें रुपये जमवले होते; पण दोन हजार—कुठे मिळणार आपणाला इतके पैसे ? सारा दवाखाना गरगर फिरतो आहे असें श्रीधरपंतांना क्षणभर वाटूं लागलें. त्यांनी हातांनी डोकें दाबून धरलें.

डॉक्टरांच्या डोळ्यांत अश्रु चमकले. ते उठले व श्रीधरपंतांजवळ आले.

" पंत, मला कल्पना आहे तुमच्या परिस्थितीची; पण सुखासुखी का मी तुम्हाला सांगतों आहें हें ?-माझ्याजवळ आज चारशें रुपये आहेत..."

" माफ करा डॉक्टर, तुम्ही करणार असलेली मदत तुमच्या उदारपणाला साजेशी आहे. पण आकाशच फाटल्यावर तुम्ही त्याला किती ठिगळं देणार ? आज माझ्याजवळ फक्त दोनशें रुपये आहेत; बाकीचे पैसे मला आता कुठंहि मिळणं शक्य नाही...पण डॉक्टर, दया, माणुसकी म्हणून हे हप्त्यानं पैसे फेडले तरी ते यायला तयार होणार नाहीत का ? आपण स्वतः जाऊन त्यांची मनधरणी केली तरीसुद्धा ! "

" श्रीधरपंत," डॉक्टर मान हालवीत म्हणाले, " या मनुष्याचा पैसा

ह्याच देव व पैसा हेंच ध्येय आहे. दया, माणुसकी वगैरे गोष्टी नतर !– अगोदर दररोजची चारपांचशेंची प्रॅक्टिस बुडवून दोनतीन दिवस तो इकडे यायला तयार होईलच याचा भरंवसा नाही. पंत, हा धंदा असा आहे, की यांत माणुसकी मेलेली असते—"

"तरी पण आपण प्रयत्न केला तर–" श्रीधरपंत म्हणाले, "मनु-ष्याच्या माणुसकीवर माझा विश्वास आहे. मी त्यांचं मन वळवूं शकेन असं मला वाटतं. जाऊं या आपण दोघे मुंबईला. मधूकरतां काय वाटेल तें दिव्य करायला मी तयार आहे. दुर्दैवाने मधू गेलाच तर त्याला वाचवण्यासाठी मी जंगजंग पछाडले असं तरी वर तो देवाला सांगेल. मग डॉक्टर, येता ना आज ?"

"ठीक आहे." डॉक्टर जराशा गहिवरलेल्या आवाजांत म्हणाले, "पण त्याचा फारसा उपयोग होईल असं मला वाटत नाही. तुमच्या पुण्याईचा प्रभाव त्यावर पडला तरच कांहीं तरी होण्यासारखं आहे. आज संध्याकाळच्या गाडीनं निघूं आपण. मधूच्या ड्रेसिंगसंबंधी तोंपर्यंत मी डॉ. साठ्यांना सांगून ठेवीन."

श्रीधरपंत सुन्न डोक्यानेच घरीं आले. डॉ. गोडबोले हें नांव व २००० हा आकडा या दोनच गोष्टी सारख्या त्यांच्या मस्तकांत थैमान घालीत होत्या. दोन हजार रुपये मिळाले तर मधूचा प्राण वाचतो. पण आज एवढे पैसे आणायचे कुठून ! बँकबुकांत त्यांची सारी पांच रुपये शिल्लक होती. शाळेकडून कर्ज मिळणें आतां अशक्य होतें आणि दोन हजार कर्ज देणारा सावकारहि त्यांच्या ओळखीचा नव्हता. पैसा आयुष्यात इतका महत्त्वाचा आहे याची कल्पना या क्षणापर्यंत त्यांना आली नव्हती. त्यांना आठवलें, कालच "सुख संपत्तीवर अवलंबून असतं का ?" हा वादग्रस्त विषय उकरून काढतांना संपत्तीपेक्षा मानसिक समाधान हेंच मानवी जीवन जास्त सुखी करूं शकतें, हा मुद्दा मोठ्या आवेशाने आपण प्रतिपादन केला होता. पण त्याचा फोलपणा इतक्या लवकर अनुभवाला येईल अशी त्यांची कल्पनाहि नव्हती. आज पैशाच्या सामर्थ्यावर सारें जग चाललें आहे; मनुष्याला मनुष्यपणा येण्याला आज पैसाच कारणीभूत आहे. पैसेवाल्याचें जीवन आज

अधिकाधिक सुखमय होत आहे व दरिद्री लोकांना पुरेसें अन्न खावयास मिळण्याची भ्रांत पडली आहे. सुख "पैशावर अवलबून असतं का?" किती वेडा प्रश्न ! समाधान, शांति इत्यादि साऱ्या गोष्टी आज फोल आहेत. आपल्या मनाची समाधानी वृत्ति आपल्या लाडक्या मधूचा प्राण वांचविण्यास समर्थ आहे का? आपण समोर ठेवलेल्या स्वार्थत्यागाच्या ध्येयाचा आजच्या प्रसंगीं काडीचा तरी उपयोग होतो आहे का? स्वार्थत्याग—ध्येयदीप... शब्द बोलायला मोठे गोंडस आहेत. पण व्यवहाराच्या बाजारांत नाण्याच्या आवाजावर सारीं भुतें नाचत असतात ! स्वार्थत्याग, ध्येय समाधान या गोंडस शब्दाला आज किती किंमत आहे ?

विचार करतांकरतां त्यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत केलेल्या किती तरी विद्यार्थ्यांचे चेहरे त्यांच्या नजरेसमोरून गेले. कित्येकांनी पत्र रूपाने त्यांची अद्याप ओळख ठेवली होती. कित्येक त्यांना पार विसरून गेले होते. शिक्षकाच्या जीवनांत नाही तरी आणखी कोणत्या गोष्टीची अपेक्षा धरावयाची ? शिक्षक नदीच्या प्रवाहाप्रमाणे जाग्यांवर असतात. पण प्रवाहावर पुष्ट झालेले विद्यार्थिजन पुढे पुढे जात असतात; पुढे गेलेल्या माणसाला मागे वळून पाहण्याचें काय कारण ?

कर्र्र्र्र्र टण् ! घड्याळाच्या ठोक्याने श्रीधरपंत एकदम तंद्रींतून जागे झाले. घड्याळांत अडीच वाजले होते. साडेतीनच्या एक्सप्रेसने त्यांना मुंबईला जायचें होतें. अडीचच्या पुढील तासांची सोय हेडमास्तरांना सांगून त्यांनी अगोदरच करून घेतली असल्यामुळे त्यांना थांबण्याचें कांहीच प्रयोजन नव्हतें. शेजारची टोपी उचलून त्यांनी डोक्यावर चढवली व ते बाहेर पडले. मघाशी ज्या वर्गावर त्यांनी तास घेतला होता, त्या वर्गावरून जात असतां सहज एका विद्यार्थ्याचे उद्गार त्यांच्या कानांवर पडले, "आज सरांच्या भावाला झालेलं दिसतं कांही तरी ! शाळा सुटल्यावर घरीं जाऊं या आपण त्यांच्या !"

डॉक्टर त्यांची वाटच पाहत होते. श्रीधरपंत आल्याबरोबर त्यांच्या करितां तयार करून ठेवलेला चहा डॉक्टरांनी त्यांच्यापुढे ठेवला. डॉक्टरांना श्रीधरपंताबद्दल केवळ सहानुभूतीच वाटत नव्हती; तर ध्येयवादी

मनुष्य म्हणून त्यांच्याकडे ते आदराने पाहत होते. त्यांच्या या आणीबाणीच्या समयाला आपण जास्तींत जास्त साहाय्य त्यांना करूं शकत नाही याबद्दलहि त्यांच्या मनांत खिन्नता निर्माण झाली होती.

—एक्सप्रेस वायुवेगाने आपला मार्ग कापीत होती. गाडींत डॉक्टर व श्रीधरपंत यांचें प्रत्यक्ष संभाषण फार थोडें झालें? दोघेहि आपल्याच विचारांत चूर होते. आपली मोहीम कितपत यशस्वी होऊं शकेल या चिंतेंत डॉक्टर चूर होते. श्रीधरपंतांच्या मनांत आतापर्यंत कधीहि न उद्भवलेले पैशाचे पेंचप्रसंग तांडवनृत्य करीत होते दादर आलें तरी त्या दोघांनाहि त्याची दादच नव्हती! एका हमालाने 'साहेब हमाल' म्हणून त्यांचा समाधिभंग केला नसता तर कदाचित् ते दोघेहि थेट बोरीबंदरपर्यंतहि गेले असते.

भाड्याची टॅक्सी त्यांनी डॉ. गोडबोले यांच्या खाजगी बंगल्याकडे वळवली. डॉक्टरनी डॉ. गोडबोल्यांचा खाजगी पत्ता मुद्दाम मिळविला होता. ज्या कांही कांही गोष्टी दवाखान्यांत बोलणें कठीण जातें, त्याचा प्रस्ताव घरीं चांगल्या रीतीने करतां येतो याची त्यांना जाणीव होती. डॉ. गोडबोल्यांचा बंगला माटुंग्याला होता. बंगला अतिशय भव्य व सुंदर होता. दरवाजाशींच कोरी करकरीत रॉल्सरॉइस जणूं डॉक्टरसाहेबांचीच वाट पाहत थांबली होती.

डॉक्टरांनी आपल्या व्हिजिटिंग कार्डावरच श्रीधरपंतांचें नांव घालून दरवाजा उघडणाऱ्या नोकराकरवीं तें कार्ड डॉ. गोडबोल्यांकडे पाठविलें. थोड्याच वेळांत नोकर परत आला व त्यांनी उभयतांना भव्य दिवाणखान्यांत बसविलें.

श्रीधरपंतांचें हृदय अपेक्षेने व भीतीने धडधडूं लागलें होतें! या माणसाच्या होय नाही म्हणण्यावर आपल्या मधूचें जीवन अवलंबून आहे या जाणीवेने त्यांच्या अंतःकरणांत सारखी कालवाकालव होत होती. आशानिराशेचें तुमुल युद्ध मनांत चाललें होतें. भयमिश्रित उत्कंठेने थरारणाऱ्या नजरेने साऱ्या दिवाणखान्याचें मोजमाप ते घेत होते. दिवाणखाना अतिशय भारी सामानाने, निरनिराळया चित्रांनी व फोटोंनी सजवलेला होता. त्यांपैकी एका फोटोवर त्यांची नजर स्थिर झाली. कांही

तरी शंका त्यांच्या मनांत आली. ते ताडकन् उठले व फोटोजवळ जाऊन ते तो फोटो न्याहाळून नीट पाहूं लागले. कातर आवाजांत त्यांनी डॉक्टरकडे वळून विचारलें, " हा हो कुणाचा फोटो ? "

" अहो, हेच डॉक्टर गोडबोले ! " डॉक्टरांनी उत्तर दिल्याबरोबर श्रीधरपंतांनी कपाळावर हात मारून घेतला !

" दुर्दैव माझं ! दुसरं काय ? डॉक्टर, चला इथून आता ! कुठलं आपलं काम होतंय् आता ? " श्रीधरपंत हृदय पिळवटून बोलत होते. डॉक्टर स्तिमितच झाले त्यांच्या या वर्तनाचा त्यांना अर्थच कळेना.

" काय हो, काय झालं ? " त्यांना डॉक्टरानी विचारलें.

" अहो, हे डॉ. गोडबोले म्हणजे कोण असं तुम्हांला वाटतं ? " श्रीधरपंत म्हणाले, " वीस वर्षांपूर्वी मी ज्याला उनाडकीबद्दल व भलत्या व्यसनांत सांपडल्याबद्दल बडवलं, अन् ज्याची मी साऱ्या वर्गांतून धिंड काढायला लावली, तोच हा पोरगा ! अन् हा कसला आता माझ्या उपयोगी पडणार ? तुम्हांला माहित नाही, डॉक्टर ! शाळा सोडून जातांना त्यानं उद्गार काढले होते, ' श्रीधरपंतांनी माझा अपमान केला आहे, पाहून घेईन ! ' हा कसला माझ्या मधूचे प्राण वांचवणार ? डॉक्टर, व्यर्थ मृगजळाच्या मागं धांवलों आपण ! "

—पण इतक्यांत एक गडी बाहेर आला. त्याने डॉक्टरांना आंत बोलावून नेलें.

दिवाणखान्यांत एकटेच राहिल्याने श्रीधरपंत फिरून एकदा विचाराच्या झंझावातांत सांपडले. काय दैव आहे पहा ! सबंध शाळेच्या जीवनांत आपण-त्याच्या कल्याणाकरितां कां होईना-पण एका विद्यार्थ्याला दुखवावें व त्याच विद्यार्थ्यांचे पुढील आयुष्यांत पाय धरण्याचा प्रसंग यावा ! दैव तरी काय विचित्र कलाटणी देत असतें परिस्थितीला ! तो उनाड मुलगा मुंबईतला सुप्रसिद्ध डॉक्टर व्हावा आणि त्याला शाळा सोडण्याला जबाबदार असलेल्या आपणाला नामुष्कीने नाक धरून त्याच्यापुढे भीक मागण्याचा प्रसंग यावा ! आता कसची मधूची आशा ! या प्राण्याला थोडाच द्रव फुटणार आहे माझ्याकरितां ! उलट सूडाची संधि मिळाली म्हणून आनंदाच्या उकळ्या फुटल्या असतील त्याच्या मनांत. ' श्रीधरपंतांना म्हणावं पाहून

घेईन ! ' हे शब्द जणूं त्यांच्या कानांत घुमताहेत असं त्याना वाटूं लागलं ! त्यांनी भावनेच्या आवेगांत दोन्ही हातांत तोंड खुपसलें.

त्यांच्या पायाशीं कसली तरी हालचाल झाली म्हणून त्यांनी दचकून तोंड वर केलें. विश्वासच बसेना त्यांचा त्यांच्या डोळ्यावर ! फोटोंतील ती व्यक्ति—तो प्रसिद्ध डॉ. गोडबोले—तो सूडाची प्रतिज्ञा केलेला उनाड गोडबोले—आपल्या पायाशीं—स्वप्न तर नव्हे ना हें ? ' छे ! भासच हा ' या कल्पनेने त्यांनी डोळे चोळले. पण तेंच चित्र फिरून समोर.

" श्रीधरपंत क्षमा करा मला ! " ती व्यक्ति गद्गद आवाजांत बोलत होती. वास्तविक वीस वर्षांपूर्वीं मीं आपली क्षमा मागायला पाहिजे होती–आपण मला त्यावेळी शुद्धीवर आणलं–आपण मला योग्य मार्ग दाखवलात. मी रागावलों त्या वेळी तुमच्यावर—नाही नाही तें बोललों तुमच्याविषयी ! पण तुमच्या शिक्षेमुळं आज मला हे दिवस दिसत आहेत. "

" डॉक्टरसाहेब,-हे काय भलतंच ! उठा, मी आज तुमच्याकडे हात जोडून विनंति करण्यासाठी आलों आहे. उलटा प्रकार काय चालवला आहे तुम्हीं ! तुमच्यासारख्या मोठ्या डॉक्टरांनी आमच्यासारख्या क्षुल्लक माण-समोर हात जोडणं शोभत नाही " श्रीधरपंत त्यांना उठवीत म्हणाले.

" मोटा ?—श्रीधरपंत, मला उगीच कां लाजवतां ? स्वार्थत्याग करून तुम्ही तरूण पिढीचीं मनं घडवतां; त्यांना मार्गदर्शन करतां; त्यांना मोहमार्गापासून परावृत्त करतां; ते तुम्ही क्षुल्लक ! आणि पैशाच्या पाठीमागं लागून मोठमोठे बंगले उभारणारे आम्ही मात्र मोठे !" डॉक्टर बोलत होते, " श्रीधरपंत, व्यक्तीचं मोठेपण पैशावर अवलंबून नसतं; तो करीत असलेल्या कार्यावर अवलंबून असतं; आज तुमच्या या डॉक्टरांनी तुमच्याविषयी हकीगत सांगितली आणि त्या वेळी माझी पैशाची धुंदी पार उतरली. पैसा खोऱ्यानं ओढण्यांत मी आज मोठं भूषण मानीत होतों; लक्षाधीश बनणं हेंच माझं ध्येय ठरवलं होतं मी; पण उदात्त ध्येयाच्या तेजापुढं पैशाचं पार्थिव ध्येय फिकं पडतं हें आज तुमच्या जीवनावरून मला दिसून आलं ! आणि अशा तुमच्याबद्दल मी त्या वेळी वाटेल तें बोलत होतों, याची खरोखरच मला शरम वाटते ! "

" डॉक्टर, जाऊं द्या त्या गोष्टी; लहान होतां तुम्ही त्यावेळी.

माझ्या भावाविषयी तुम्हाला डॉक्टरांनी कांही सांगितलं असेलच." श्रीधरपंतांनी मुख्य विषयाला हात घातला.

"हो तर. आमच्याकडे जेवण करून आपण तिघेहि अर्ध्या तासांतच रात्रीच्या गाडीनं निघणार आहोंत. तुमच्या भावाची प्रकृति डॉक्टरांच्या सांगण्यावरून जरा गंभीर दिसते; पण मी त्याला बरा करूं शकेन याबद्दल मला खात्री वाटते."

"पण फीसंबंधी—" श्रीधरपंत जरा अडखळत म्हणाले.

"श्रीधरपंत," डॉक्टरांनी त्यांना मध्येच अडवलें, "तुमच्याकडून मी फी घेण्याइतका कृतघ्न असेन असं वाटतं तरी कसं तुम्हांला ? आज माझ्या या परिस्थितीला तुम्ही जबाबदार आहांत. तुम्ही जर त्याच वेळी मला योग्य शासन केलं नसतं, तर आज मी कदाचित् एक बदमाष व्यसनी म्हणूनहि ओळखला गेलों असतों. त्या तुमच्या एकाच कृत्याबद्दल मीं तुम्हाला वाटेल ती गुरुदक्षिणा दिली, तरी ती अपुरी पडेल !—बोलूं नका तुम्ही आता ! आंत जेवायला जाऊं आपण–संभाषणाला नंतर पुष्कळ वेळ आहे."— असें म्हणत डॉ. गोडबोल्यांनी श्रीधरपंतांना जवळ जवळ ओढीतच आंत नेलें. श्रीधरपंतांच्या डोळ्यांत अश्रुबिंदु उभे होते. शिक्षकाच्या जीवनांतसुद्धा तपश्चर्येचें फळ मिळत असतं याची त्यांना कल्पनाहि नव्हती.

जेवत असतांना त्यांचा विनोदी स्वभाव जागृत होऊन ते म्हणाले, "पण डॉक्टर, शाळा सोडतांना तुम्ही माझा सूड घ्यायची प्रतिज्ञा केली होतीत, विसरलांत वाटतं ती ?"

"वा ! चांगलीच लक्षांत आहे ना ती !" डॉ. गोडबोले हंसत म्हणाले, "फी घेतल्याशिवाय तुमच्या भावाचं ऑपरेशन करणार हा तुमचा एक विचित्र सूडच नाही का ? माझ्याकडून फुकट काम करून घेतांना तुम्हाला वाटणारा संकोच हाच माझा मोठा सूड नाही का ? म्हणजे माझी प्रतिज्ञा मीं पाळली. आहे ना विचित्र सूड ?"

श्रीधरपंत यावर काय बोलणार ? ते फक्त हंसले व दोन्ही डॉक्टरांनी यांच्या हंसण्याला सांथ दिली.

● - ●

## बेकारीचा बळी : : ७

गुडघ्यावर दोनतीन ठिगळें लावलेली ती विजार, पूर्वी कधीकाळी हिरवा रंग असल्याचा आभास उत्पन्न करणारा पण आता कोणत्याहि रंगाशीं साम्य नसलेला तो कोट, कॉलरवर फाटलेला आणि छातीच्या ठिकाणीं दोनतीन ठिगळे दिलेला तो खाकी रंगाचा सद्रा, चार दिवसांत पोटभर अन्न खाण्यास न मिळाल्यामुळे खोल गेलेले व निस्तेज झालेले त्याचे ते डोळे आणि थंडीमुळे हिरवेनिळे झालेले व सारखे काकडत असलेले त्याचे ते हात त्यामुळे तो कारुण्याचा एक मूर्तिमंत पुतळाच दिसत होता. काटकसरीच्या कचाट्यांत त्याची पूर्वीची गिरणींतील नोकरी गेल्यामुळे आज एक आठवडा तो कुठेतरी काम मिळविण्याकरिता सारखा वणवण मुंबईत भटकत होता; पण सगळीकडे एकच उत्तर! 'जागा नाही'! या उत्तराने तो अगदी निराश होऊन गेला होता. आज सकाळपासून विशेषतः पोटांत अन्नाचा कणहि न गेल्याने त्याला विलक्षण ग्लानि आली होती. तशांत बाहेर थंडीचा कडाका! पण अशाहि स्थितींत वेस्ट एंड सिनेमाच्या मॅनेजरला भेटून डोअरकीपरची नोकरी मिळवण्याची खटपट करण्याच्या उद्देशाने तो थिएटरपाशीं आला, पण तेथील भय्याने त्याला बाहेरच्या बाहेरच हाकून दिल्यामुळे खिन्न अंतःकरणाने तो परत जात होता.

पण परत जात होता हें म्हणणें जरा अतिशयोक्तीचें होईल. परत

जाणाऱ्या लोकांना परत जाण्याला एखादें घर किंवा खोली अशी विशिष्ट जागा तरी असते! पण आज त्याला तेंहि नव्हतें. सकाळीच चाळीच्या मालकाने सहा महिन्यांचें भाडें थकल्याबद्दल त्याला बाहेर काढलें होतें. तो रस्त्याने जात होता. पण कुठे जात होता हें त्याचें त्यालाहि माहिती नव्हतें. पाय चालण्याचें काम करीत होते आणि मन विचार करण्याचें काम करीत होतें—आणि विचारसुद्धा एखाद्या विशिष्ट गोष्टीचा नाहीच—क्षणांत आपल्या बालपणाच्या सुखद आठवणी डोळ्यासमोरून जात. क्षणांत आपल्या विवाहाचा प्रसंग व आपला वैवाहिक जीवनपट त्याच्या डोळ्यासमोरून जाई. क्षणांत पत्नीच्या मृत्युशय्येवरील देखावा त्याच्यासमोर उभा राही. नाना तऱ्हेच्या आठवणींनी व बऱ्यावाईट विचारांनी त्याच्या मनांत गोंधळ उडवून दिला होता. आणि मागाहून येणाऱ्या मोटारने जर हॉर्न वाजविला नसता तर त्या कल्पनासाम्राज्यांत तो आणखी किती चालून गेला असता कोण जाणें!

मोटार—हॉर्नने शुद्धीवर आल्यावर त्याला प्रथम कोणत्या गोष्टीची जाणीव झाली असली तर ती म्हणजे आपले पाय अतिशय दुखत आहेत... थंडीने आपण अगदीं कांकडून गेलों आहोंत आणि भुकेने पोटांत हलकल्लोळ उडविला आहे. पण या गोष्टी कळून येऊन काय उपयोग? खिशांत पैसा असला तर तीनहि गोष्टींवर उपाययोजना करतां येते. पण जवळ एकहि पैसा नसतांना भूक लागल्याचें कळून उपयोग काय? आणि निवाऱ्याची जागा नसल्यावर थंडी वाजत असल्याची भावना व पाय दुखत असल्याची कल्पना मनांतून काढण्यापलीकडे त्यावर दुसरी उपाययोजना कोणती करणार! आजूबाजूला मोटारी, ट्रॅम्स वगैरेमधून लोक सारखे येत जात होते. अतिशय वैषम्याने त्याने त्यांच्याकडे पाहिलें! किती सुखी हे लोक! निदान दोन वेळेला पोटभर खाण्याला अन्न व रात्रीं झोपण्याला हक्काची जागा तरी आहे यांना आणि आपण? खरोखर या जगांत आपणासारखा दुर्दैवी प्राणी असेल का कुणी?

विचार करत असतांना त्याच्या शेजारींच खळ्खळ् असा आवाज झाला. त्याने दचकून तिकडे पाहिलें. हातांत बेड्या असलेला एक कैदी

दोन पोलिसांच्या मधून चालला होता. त्याला वाटलं—खरंच ! आपल्यापेक्षाहि दुर्दैवी प्राणी जगांत आहेत तर. कोणता बिचाऱ्याने गुन्हा केला असेल कोण जाणे ! माझ्यासारखाच भुकेने व्याकुळ होऊन परिस्थितीने त्याला गुन्हा करायला भाग तर पाडलें नसेल ! पण......पण एका दृष्टीने तो माझ्याहिपेक्षा जास्त सुखी नाही का ! तुरुंगांत त्याला झोंपायला जागा आणि खायला अन्न तरी मिळेल ! आणि आपल्याला...

आणि त्याच वेळीं त्याच्या मनांत विचार आला कीं, बाहेरच्या जगांत राहून हे हाल सोसण्यापेक्षा तुरुंगांत गेलेलें काय वाईट ? स्वतंत्र जगांत होणारी उपासमार तरी तुरुंगांत गेल्याने टळेल ! पण तुरुंगांत जायचें म्हणजे कसें ? त्याला कांही तरी गुन्हा केलाच पाहिजे एखाद्या शिपायाजवळ जावयाचें आणि त्याला सांगायचें, अरे मला तुरुंगांत जायचें आहे चल पाहूं लवकर ! आणि शिपायानेहि मान डोलावून त्याची रवानगी तुरुंगाकडे करावयाची; इतकी तुरुंगांत जाणें ही सोपी गोष्ट नाही. कोणता गुन्हा केला पाहिजे तुरुंगांत जाण्याकरितां मग ? आणि आपल्याला तें जमेल का ? कधीच संवय नाही अद्याप ! विचार करतां करतां तो एका कापडाच्या दुकानासमोर आला. रात्रीं आठाची वेळ असल्याने रहदारी विशेष नव्हतीच आणि दुकानहि बंद होण्याची वेळ होत आल्याने आताहि गिऱ्हाइकांची फारशी गर्दी नव्हती. अशा वेळी एकदम एक विचार त्याच्या मनांत आला. या दुकानाचें बाहेरचें कांचेचें मोठें तावदान फोडलें तर ? वा ! किती सोपा उपाय ! नक्कीच आंतील लोक बाहेर येऊन आपणाला पकडून पोलीसच्या स्वाधीन करतील. आणि आपल्याला तरी दुसरें काय पाहिजे ?

मोठ्या मुष्किलीने त्याने जवळपास हुडकून एक धोंडा मिळविला व जोराने त्याने तो त्या तावदानावर फेंकला. 'खळखळ' एकदम मोठा आवाज झाला. दुकानांत त्या आवाजाने गडबड उडाल्याचें त्याने ऐकलें. आंतील लोक बाहेर येण्याची व आपल्याला पकडण्याची वाट पाहात हंसत विजारीच्या खिशांत हात घालून तो बाहेर उभा राहिला.

थोड्याच वेळांत पांचसहा लोकांचा घोळका एकदम बाहेर आला.

एकदोन पोलिसही होते त्यांत ! त्यांनी त्या हंसत असलेल्या मनुष्याला पाहिलें. सर्वजण एकदम त्याच्याकडे आले.

"कुठे गेला? कुठे गेला तो माणूस तावदान फोडून?" सारेजण एकदम त्याला विचारूं लागले.

"म्हणजे ! तावदान फोडणारा तुम्हाला तुमच्यासमोर दिसत नाही का? मीच तावदान फोडलें ! पकडा मला !" तो हंसत म्हणाला.

'हा माणूस वेडा तर नाही?' या भावनेने त्या साऱ्या लोकांनी त्याच्याकडे पाहिले. तावदान फोडणारा माणूस असा एके ठिकाणीं उभा राहून तावदान फोडण्याचें कधीं तरी जाहीर करील का? इतक्यांत सुरू झालेली ट्रॅम पकडण्याकरितां धावत चाललेला माणूस दिसला. त्यांना वाटलें तोच तो तावदान फोडणारा माणूस ! सारेजण त्याच्या मागे धांवत गेले. तेवढ्यांत त्या माणसाने ट्रॅम पकडली होती. त्याच्या मागून आलेल्या ट्रॅममध्ये हे लोक शिरले व त्याचा पाठलाग सुरू केला. आणि तुरुंगांत जाण्याचा पहिला प्रयत्न अयशस्वी झाल्याबद्दल खिन्न मुद्रेने तो पुढे चालूं लागला.

आता कोणत्या रीतीने प्रयत्न केला म्हणजे पहिल्यासारखा गैरसमज न होता सहज रीतीने बेड्या हातांत पडतील याविषयी त्याचा विचार सुरू झाला. कितीतरी कल्पना त्याच्या डोक्यांत येत होत्या—पण कांही कल्पना त्याला तुरुंगाच्या दारांत पोहोचविण्याला असमर्थ होत्या तर कांही कल्पना त्याने अमलांत आणल्या असल्या तर तुरुंगाच्या ऐवजी वेड्याच्या इस्पितळांतच त्याची रवानगी होण्याचा जास्त संभव होता जातां जातां वाटेवर एक पोलिस उभा असलेला त्याला दिसला, आणि त्याचवेळी एक गृहस्थ लगबगीने छत्री घेऊन समोरून येत असलेला त्याने पाहिला. त्याच्या मनांत फ्लॅश लाईटप्रमाणे एकदम कांही तरी विचार आला.

तो गृहस्थ जवळ येतो न येतो तोंच त्याने पटकन् उडी मारून एकदम त्याच्या हातांतील छत्री हिसकावून घेतली व गंभीर मुद्रेने पुढे चालूं लागला. या अनपेक्षित हल्ल्याने क्षणभर तो गृहस्थ स्तिमित होऊन आ करून बघतच राहिला.

"अहो सभ्य गृहस्थ, छत्री माझी आहे." तो गृहस्थ मागे जात त्याला थांबवीत म्हणाला. "धडधडीत हातांतून जिन्नस पळवितां कां !"

" पण मी म्हणतों छत्री माझी आहे ! " तो जरा ऐटीनें उभा रहात म्हणाला, " अन् तुम्हाला खोटें वाटत असेल तर तो पाहिलात का पोलीस ? जा त्याच्याकडे ! सांगा त्याला की ह्याने माझी छत्री पळविली म्हणून ! आहे छाती ? "

त्याला खात्री होती की हा छत्रीवाला गृहस्थ पोलिसाला आणणार. पोलिस आपणाला पकडून चौकीवर नेणार. आणि कोणत्यातरी उबहार कोठडींत आपणाला झोप घ्यायला मिळणार... पण या कल्पनासृष्टींतून त्या छत्रीवाल्या गृहस्थाने त्याला एकदम बाहेर ओढलें.

' अरे...क्षमा करा हं. तुमची छत्री होती हें मला माहित नव्हतं... चूकभूल नेहमीच होते'...वगैरे कांहीतरी पुटपुटत आश्चर्याने ' आ ' केलेल्या त्याच्याकडे दुर्लक्ष करून गर्दींत पार नाहीसा झाला, पोलिसांची नजर आपणांकडे आहे हें पाहून तो छत्री घेऊन पुढे निघाला, पण झाल्याप्रकाराने तो इतका संतापला होता की रागाने त्याने ती छत्री धाड्कन् फुटपाथच्या कडेला फेकून दिली. तुरुंगांत जाण्याच्या मार्गांतसुद्धां इतकीं विघ्नें हंऽ ! हे पोलिस लोक मग करतात तरी काय ? छे ! त्यांना चांगलीच अद्दल घडविली पाहिजे आता ! स्वतःवर बेतल्याखेरीज ते आपणाला तुरुंगाची हवा दाखविणें शक्य नाही. त्यांच्यावरच आता हल्ला केला तर ?

आणि हा निश्चय त्याने केला न केला तोंच समोरून एक पोलीस येतांना दिसला. ताबडतोब फारसा विचार न करतां त्याने फाड्दिशीं त्याच्या श्रीमुखांत ठेवून दिली व म्हटलें, " मूर्ख माणसा, या भागांत कां रेंगाळतो आहेस ? अक्कल कुठे गेली तुझी ? "

योगायोग म्हणजे तो शिपाई अगदीं नवीन होता आणि तीन चार दिवसापूर्वी असाच हिंडत असतां एका मवाल्यासारख्या दिसणाऱ्या माणसाने त्याच्या श्रीमुखांत दिली होती. अर्थात् त्यावेळेला त्या मवाल्याला पकडून जोराने गेटावर नेले होते. आणि त्यावेळीं त्याला कळून आलें की तो मवाली नसून वेषांतर केलेला इन्स्पेक्टर होता व आपली नेहमीची हद्द सोडून दुसऱ्या हद्दींत उगाचच भटकल्याबद्दल त्या इन्स्पेक्टरने त्याला

तेथेच शासन केलें होतें. या शासनाशिवाय उद्दामपणाची भाषा वापरल्या-बद्दल त्याला दंड झाला होता तो निराळाच !

हें उदाहरण त्याच्या डोळ्यासमोर अगदी ताजें होतें अन् शिवाय या खेपेसहि तो आपली हद्द सोडून सहज गंमत म्हणून दुसऱ्या भागांत हिंडत होता. त्यामुळे त्याची खात्री झाली की, हा तोच इन्स्पेक्टर वेषांतर करून हिंडतो आहे; आणि त्याने पुन्हां आज आपल्याला आपली हद्द सोडतांना पकडलें आहे. त्यामुळे तो अतिशयच घाबरला. त्याला वाटलें आता या खेपेस आपणास किती दंड होतो कोण जाणे ! पकडले जाण्याच्या अपेक्षेने उभ्या असलेल्या त्या गृहस्थाला तो शिपाई चाचरत सलाम करीत म्हणाला " यस्, सर, नो सर ! सहज इकडे आलों होतों. निघालोच सर !" आणि आश्चर्याने दुसऱ्यांदा ' आ ' केलेल्या त्याला तसेच आश्चर्यात सोडून तो पार नाहीसा झाला.

समोर एकदम धरणीकंप होऊन तो पोलीस पार हवेंत उडाला असता तरी त्याला इतकें आश्चर्य वाटलें नसतें. पोलिसला चांगली सण-सणीत कानशिलांत ठेवून दिली तरीं पोलीस आपणाला पकडायच्या ऐवजीं ' यस सर, नो सर ' करतो काय, आणि एकदम नाहीसा होतो काय ? वेड तर नाही लागले त्या पोलिसाला ? मघाचा छत्रीवाला गृहस्थ असाच ! चांगलं पोलिसच्या ताब्यांत द्यायचं तें कांहीतरी पुटपुटत स्वतःच नाहीसा झाला ! हे लोक तुरुंगविध्वंसक मंडळाचे सभासद तर नाहींत ?

आता या खेपेला जास्त मोठ्या प्रमाणावर गुन्हा केला पाहिजे. एकटा पोलिस असला की, तो पकडण्याचें टाळतो काय ? या खेपेला आता भोंवतालीं लोकांची गर्दी निर्माण करून पोलिसाला आपणाला पकडणें भागच केलें पाहिजे. समजा मारामारी केली तर ? पण कुणाशीं ? तो समोरून येणारा गृहस्थ चांगला सभ्य दिसतोय् ! त्यालाच चांगला चोपला तर ? बघूं या तरी ?

असा विचार करीत जाता जाता त्याने त्या सभ्य गृहस्थाला एकदम धक्का दिला. झालं ! त्या गृहस्थाने शिव्या द्यायला सुरवात केली. त्याबरोबर याने पुन्हा एक कानशिलांत ठेवून दिली. आणि मग दोघांची जी जुंपली ती

चांगलीच जुंपली ! दोघंहि फुटपाथवर लोळण घेऊं लागले. लोकाची आजु-बाजूला खूपच गर्दी जमली. कांही वेळाने अधिकाऱ्यांचा आवाज ऐकूं आला व फौजदार साहेबांची स्वारी तिथे उपस्थित झाली. दोघांनाहि त्यांनी सोडविलें व आपणापुढे उभे केलें.

तो आता या खेपेस अगदी खुषींत होता. आपली युक्ति आता अगदी सफल झाली. पांच मिनिटांनीच आपण तुरुंगाच्या कोठडींत विश्रांति घेत असूं, अशा सुखस्वप्नांत तो असतांनाच फौजदाराचा गंभीर स्वर त्याच्या कानावर पडला.

"कुणी सुरू केली ही मारामारी ?"

"त्–त्–त्–त्याने ... म्–म्–मला..."

दारूच्या तारेंत बोलल्याप्रमाणे सभ्य गृहस्थ बोलूं लागले. फौजदार त्याचेकडे वळून कांही बोलणार तोंच बघ्यांपैकी एक पुढे आला व म्हणाला, "फौजदारसाहेब—मी पाह्यलं सगळं ! मी सांगतों तुम्हाला ! हे सभ्य गृहस्थ दारूच्या तारेंत येत असताना त्यांनी या ( कथानायकाकडे बोट करून ) या दुसऱ्या गृहस्थाला अडवलें व शिव्यांची लाखोली वाहायला सुरवात केली. अर्थात् विनाकारण शिव्या कोण सहन करील ? या गृहस्थाने त्याच्या एक कानशिलांत ठेवून दिली. त्याबरोबर हा झिंगलेला गृहस्थ चिडला—आणि त्यांच्याशीं दंगा करूं लागला. पण दारूच्या धुंदीमुळे व पायांत जोर नसल्या-मुळे त्यांचा तोल गेला आणि या दुसऱ्या गृहस्थाला घेऊन खालीं आपटला. इतक्यांत तुम्ही आला......"

"बरोबर आहे, फौजदारसाहेब ! या दारुड्याकडेच सगळा दोष आहे !" दुसऱ्याने त्याला पुष्टि दिली.

"लेकाचे चोरून दारू पितात ते पितात पण मग तर्रर्र होऊन रस्त्याने कशाला हिंडतात ? अशीच अद्दल पाहिजे या लोकांना.........सभ्य म्हणवतात...!" तिसरा एक उद्गारला.

तो मात्र हीं सारीं भाषणें चाललीं असतांना विस्फारित नेत्राने पहात होता. म्हणजे हाहि प्रयत्न फसला कीं काय ? सभ्य गृहस्थ म्हणून चुकून एका दारुड्यावरच आपण हल्ला केला तर ! आणि दुर्दैव म्हणजे जमलेल्या

सर्व लोकांची सहानुभूति आपणाकडेच आहे ! छे ! आता कसला तुरुंग न् कसलं काय ? फौजदारसाहेबांनी अद्याप आपलें मत व्यक्त केलें नव्हतें— पण गुन्ह्याचें सर्व खापर त्यांनी आपल्याच माथी फोडलें तर...अहाहा !

लोक त्या दारुड्याची कुचाळकी करीतच होते. इतक्यांत मधेच तो ओरडला. " स्–स्–सारें खोटें आहे हें......" पण लोकांच्या हसण्याच्या गोंधळांत त्याचें पुढील वाक्य कोणाला ऐकूंच गेलें नाही. फौजदारसाहेब त्याच्याकडे वळून म्हणाले, " तुम्हाला काय सांगायचें आहे ? "

त्याला हे फौजदारसाहेबांचें वाक्य ऐकून खूप आनंद झाला. त्याला वाटलें, आपण खरे सांगितलें म्हणजे ते आपणाला नक्की पकडतील. म्हणून त्याने गंभीर आवाजांत सांगितलें, "मला तुरुंगांत जायचें आहे म्हणून मीच मारामारी केली !" वाक्य संपतें न संपतें तोंच फौजदारासुद्धा एकदम सगळ्या लोकांनी जोरांत हसायला सुरवात केली. त्या सर्वांना वाटलें याने एक मोठा विनोदच केला. फौजदारसाहेब एकदे गंभीर पण तेहि त्याच्या पाटीवर थाप मारून म्हणाले, "वा राव—बरेच विनोदी दिसतां कीं तुम्ही ! छान ! लागलं बिगलं नाही ना तुम्हाला फार ? " आणि शेवटीं त्या दारूबाज गृहस्थाला दम वगैरे देऊन तें सर्व प्रकरण फौजदारसाहेबांनी तेथेच मिटविलें

आता मात्र त्याला सर्व जगाचाच संताप येऊं लागला ! नोकरी मागायला गेलों तर ' जागा नाही ' असें सांगून हाकून देतात ते देतातच आणि पुन्हा निदान तुरुंगांत जाऊन तरी पोटभर अन्न खावें म्हटलें तर त्याहि मार्गांत निरनिराळीं विघ्नें आणून ठेवतात. आज आपले ग्रहच उलटे फिरलेले दिसतात. त्याशिवाय आपला प्रत्येक प्रयत्न आपणावरच कां उलटावा ?

बाहेरची थंडी आता त्याला अधिकच जाणवूं लागली होती. पायसुद्धा दमल्याचें जाहीर करीत होते. कोणत्यातरी एखाद्या धर्मशाळेंत जाऊन पसरण्यापूर्वी शेवटचा एकच प्रयत्न करावयाचा त्याने निश्चय केला आणि आतापर्यंतच्या सर्व प्रयत्नापेक्षा हा मोठ्या प्रमाणावर करण्याचें त्याने ठरविलें. कोणता गुन्हा करावा हें ठरविण्याकरिता तो आजूबाजूला पाहूं लागला—समोरूनच त्याला ट्रॅम जातांना दिसली आणि त्याला वाटलें— खरंच, ट्रॅमच्या रूळावर बसून ट्रॅमची रहदारीच बंद केली तर ! रहदारीला

अडथळा करण्याच्या आरोपावरून ट्रॅममधील लोक नक्की आपल्याला पोलिसच्या ताब्यांत देतील. पण...पण...ट्रॅमचा धक्का लागून एखादे वेळी तुरुंगाऐवजी हॉस्पिटल पहावें लागलें तर? पण छे! हा ट्रॅम कंडक्टर रुळावर बसलेला माणूस न दिसण्याइतका आंधळा खास नसेल.'

निश्चय मनांत येण्याचा अवकाश, त्याची अंमलबजावणी ताबडतोब झालीच पाहिजे अशा मताचा तो होता. त्याने दुसरी ट्रॅम दुरून येतांना पाहिली व वळणाच्या जरा अलीकडे दोन रुळांच्या मध्यें मांडा ठोकून बसला.

"ठण् टण् ठण्" ट्रॅम कंडक्टरने जोराने वाजविलेली घंटा ऐकूं आली, पण एक रेसभरहि त्याने आपली जागा सोडली नाही. मोटारपुढे सत्याग्रह करणाऱ्या वीराचेंच वारे त्याच्या अंगांत संचारलें होतें की काय अशीच एकाद्याला शंका आली असती. पुन्हा एकदां कंडक्टरने जोराने घंटा बडविली, पण अं हं! रुळावरील पोतें थोडेंसेंसुद्धा हालेलसें त्यांना दिसेना. दोनचार शेलक्या शिव्या मोजून त्याने ट्रॅम थांबवली ट्रॅममधील सर्व डोकीं कुतूहलानें बाहेर डोकावून पाहूं लागलीं.

"ए सुवरका बच्चा—" कंडक्टर ओरडला.

"अरे मरायचं आहे का तुला? साला कांही हालतो आहे का?"

"दारू पिऊन तर्रर्र झालेली दिसते आहे स्वारी!" दुसरा एक म्हणाला.

कंडक्टर शेवटीं खाली उतरून त्याच्या जवळ आला व शिव्याचा वर्षाव करीत त्याला बाजूला होण्यास सांगितलें

पण त्याच्यावर त्याने एकच उत्तर दिलें "तुम्ही पाहिजे तर पोलिसाला आणा! मी येथून हालणार नाही!"

हें चमत्कारिक प्रकरण पाहून सारी मंडळी ट्रॅममधून खाली उतरली, आणि त्याच्याभोंवती जमली. कंडक्टरला आता जास्तच जोर आला. तो जास्त जोराने ओरडूं लागला.

त्याचा चेहरा मात्र अगदीं शांत होता, आणि उत्तरहि तेंच कायम होतें. 'तुम्ही खुशाल पोलिसाला बोलवा!'

सर्वांना या त्याच्या शांत वृत्तीचें आणि हट्टीपणाचें आश्चर्य वाटत होतें. कुणी म्हणूं लागला, "तो वेडा आहे" तर कुणी त्याला सत्याग्रही ठरवूं लागले, तर एकाने तो प्रेमभंग झालेला कवि असला पाहिजे असा आपला तर्क सर्वांना सांगितला.

पोलिसला आणायचें शेवटीं त्यांनी ठरविलें. त्याकरिता एक माणूस निघणार इतक्यांत दुसऱ्या लाइनवरून विरुद्ध बाजूने वळणावरून एक ट्रॅम आली. तीहि तिथेंच उभी राहिली व त्यांतील कंडक्टर ओरडून म्हणाला,

"अरे ऽऽ—मोटार-अपघातामुळे तुझी लाइन वळणावर अडली आहे--ट्रॅम इतक्यांत हलवूं नकोस!" आणि ती ट्रॅम पुढे चालूं लागली.

हा त्याचा एकच निरोप-पण त्यामुळे एकदम सर्वांची त्याच्याकडे पाहाण्याची दृष्टि बदलली. जे क्षणापूर्वी सर्व लोक कुचेष्टेने पाहात होते ते आता आदराने पाहूं लागले. ट्रॅम-अपघात टाळण्याकरिताच हा वीर जिवाची पर्वा न करता लाइनवर बसला होता असें त्या सर्वांना वाटूं लागलें. सर्वत्र त्याचीं स्तुतिगोत्रें ऐकूं येऊं लागलीं. क्षणापूर्वी त्याला शिव्यांची लाखोली वाहाणारा कंडक्टर आतां त्याच्या गळ्यांत गळा घालून 'मेरे भाई' म्हणून त्याला संबोधूं लागला. पण मनांतले मनांत आमचा कथानायक मात्र त्याला शिव्याची लाखोली वाहात होता. ती सर्व लोकांची आदराने पहाण्याची दृष्टि त्याला अगदी असह्य झाली. त्याला माहिती होते की, आता हे लोक आपली स्तुति करतात पण उद्या यांच्याचकडे मदत मागायला गेलों तर हेच बुटाच्या लाथा मारायला कमी करणार नाहीत. 'मेरे भाई' म्हणून आज गळ्यांत गळा घालणारा कंडक्टर उद्यां पैसे नसतांना त्याच्या ट्रॅममध्ये बसलों तर शिव्या देत बाहेर काढायला कमी करणार नाही. जगाची ही तऱ्हा त्याला पूर्ण परिचित होती. जगाचा इतका कटु अनुभव आला होता की याच जगाला दुसरी एखादी बाजू असेल असें मानायला देखील तो तयार नव्हता.

त्यामुळे आदर व्यक्त करणाऱ्या या घोळक्यांतून तो बाहेर पडला, तरी त्याचें मन अगदीं विषण्ण झालें होतें. तुरुंगांत जाण्याचा आपला

शेवटला प्रयत्नहि फसला, कुठे तरी सार्वजनिक जागेत उघड्यावर थंडीने कुडकुडत झोपणें हेंच आपल्या नशिबी लिहिलें आहे अशी त्याची पक्की समजूत झाली. त्याने आपले पाय त्याला माहिती असलेल्या एका धर्म-शाळेकडे वळविले. जात असतांना मधेंच एकदम कांहीतरी विचार मनांत आल्याने तो थांबला. त्याला वाटलें—खरंच; हा विचार पूर्वींच आपणाला कसा सुचला नाही ? तुरुंगांत जाण्याचा हा किती साधा मार्ग ! खिडकींतून उडी मारून कुणाच्या तरी घरांत शिरायचें—चाहूल लागली की घर मालक आपल्याला चोर म्हणून पोलिसच्या ताब्यांत देईलच ! छे ! इतकी सोपी युक्ति हाताशीं असून आपण उगीचच इतकी यातायात केली.

विचार करतां करतांच तो एका इमारतीच्या उघड्या खिडकीजवळ आला. फारसा विचार न करतां तो एकदम खिडकीवर चढला आणि एखाद्या निढावलेल्या चोराप्रमाणे कुणाला चाहूल लागू न देतां त्याने आंतल्या भागांत उडी टाकली.

क्षणभर स्वस्थ उभा राहून त्याने कानोसा घेतला. छे ! खोलींत कुणचि नव्हतें. भिंतीच्या कडेनें जात असतांना इलेक्ट्रिकच्या बटनवर त्याचा हात पडला आणि घरमालकाला आपल्या अस्तित्वाची जाणीव देण्याकरिता त्याने बटन दाबले. चोहोकडे एकदम लख्कन् उजेड पडला.

आणि उजेड पडल्यावर पहिली गोष्ट जर कोणती त्याच्या नजरेला पडली असेल तर टेबलावर फ्रेम केलेला एका तरुण स्त्रीचा फोटो ! त्या फोटोंतील स्त्रीकडे पाहातांच तो एकदम दचकला. त्याच्या पत्नीच्या चेहऱ्यात आणि या तरुण स्त्रीच्या चेहऱ्यांत इतकें विलक्षण साम्य होतें की क्षणभर त्याला वाटलें आपली पत्नीच आपल्याकडे पाहाते आहे की काय ? त्या फोटोंतील विलक्षण साम्यामुळे एकदम आपल्या पत्नीची मूर्ति त्याच्या डोळ्यासमोर उभी राहिली. तेवढे साम्यच त्यांच्या डोळ्यासमोर मागचा संबंध चित्रपट उभा करण्यास पुरेसें होतें

आपल्या पत्नीच्या मृत्युशय्येवरील देखावा त्याला आठवला. तिने अगदीं डोळ्यांत पाणी आणून सांगितलें होतें की, कांही झालें तरी सन्मार्ग सोडूं नका. उपदेश करण्याचा मला अधिकार नाही पण तुम्ही फार भावना-

प्रधान आहांत, जरा कुठें निराशेच्या भरांत नाही नाही ते विचार तुमच्या डोक्यांत येऊं लागतात. म्हणूनच मला तुमची काळजी विशेष वाटते. कसल्याहि खडतर प्रसंगांत परिस्थितीला तोंड देणें हेंच खरें शौर्य आहे......' तिच्या शेवटच्या भाषणांतील कांही वाक्यें तर त्याच्या हृदयावर कायमचीं कोरलीं गेलीं होतीं. तीं सारीं वाक्यें आता आपल्या कानाशीं कुणीतरी गुणगुणत असल्याचा त्याला भास झाला. त्याने त्या फोटोकडे पाहिलें. त्या फोटोंतील स्त्री जणूं कांही आपल्याला बघून हंसत आहे असा त्याला भास झाला. जणूं कांही ती त्याला म्हणत होती " किती भित्रा तूं ! आयुष्याला तोंड देण्याची भीति वाटते म्हणून तुरुंगांत जाण्याची तयारी दाखविण्याइतका मनाने हलका झालास ? "

त्याने एकदम तोंड फिरविलें ! न कळतच त्या साऱ्या आठवणी त्याच्या डोळ्यांतून अश्रू आणीत होत्या. तुरुंगांत जाण्याला तयार होण्याइतकं आपलं अध:पतन झाल्याची जाणीव त्याच्या मनाला दु:सह यात्नण्या देत होती. तुरुंगांतील एकंदर वातावरण उभें राहिल्याबरोबर त्याचें मन थरारलें. असल्या चोर, दरवडेखोर लोकांच्या संगतींत काळ कंठण्याला आपण तयार झालों होतों, आणि तेंहि आपणाला चार दिवस कुठे काम मिळालें नाही म्हणून ! त्याला स्वतःचाच तिरस्कार वाटूं लागला त्याने पुन्हा एकदा फोटोकडे पाहिलें. " प्रतिकूल परिस्थिति असतांनासुद्धा सरळ मार्गाने जीवनाशीं टक्कर देणें हेंच खरें शौर्य. " असेंच जणूं ती फोटोंतील स्त्री त्याला सांगत होती.

आपण कुठे आहोंत याचा विचारहि न करता त्याने आपले हात जोडले आणि मनांतल्या मनांत यापुढे अगदी सन्मार्गाने वागण्याची प्रतिज्ञा केली.

इतक्यांत त्याच्या खांद्यावर एक हात पडला. त्याने दचकून मागे वळून पाहिलें. शेजारीं दोन पोलिस उभे होते. " तुला आम्ही चोरीच्या आरोपावरून अटक करीत आहोंत !" असें गंभीरपणे त्याला बजावून त्यांनी त्याच्या हातांत बेड्या चढविल्या.

* * *

“ आरोपी प्रताप याने काल रात्रीं जीवनशेटच्या बंगल्यांत चोरी करण्याचा प्रयत्न केल्याच्या आरोपावरून त्याला एक वर्ष सक्तमजुरी व तीनशें रुपये दंड व दंड न दिल्यास आणखी तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत येत आहे. ” न्यायाधीशांनी दुसरे दिवशीं कोर्टांत निकाल दिला. *

●●●

* मध्यवर्ति कल्पना ओ. हेन्रीच्या एका कथेवरून